# महाराष्ट्र विधानपरिषद

## तिसरे (हिवाळी) अधिवेशन, २०१८

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### राज्यात धार्मिक वास्तूंच्या बांधकामाकरीता गृह विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र अनिवार्य करण्यात आल्याबाबत

**(१) ४१२८७ (१९-०६-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात मंदिर, मशीद, चर्च, बौध्दविहारासह अन्य धार्मिक वास्तू उभारावयाची असल्यास गृह विभागाचे ना-हरकत दाखला अनिवार्य असून सदर दाखल्याशिवाय महानगरपालिका, नगरपालिकासह ग्रामपंचायतीना कोणत्याही धार्मिक वास्तूंच्या बांधकामास परवानगी देऊ नये असे आदेश माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान गृह विभागाने काढले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर आदेशाची अंमलबजावणी केव्हापासून करण्यात येणार आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२८-०६-२०१८) :** (१) व (२) होय.

धार्मिक स्थळांच्या अनधिकृत बांधकामांना आळा घालण्यासाठी गृह विभाग शासन परिपत्रक क्र. सिटीएम २०००/प्र.क्र.२४/विशा-१ब, दिनांक ०७/०६/२००० अन्वये परिपत्रक निर्गमित करण्यात आले होते.

त्यानंतर दिनांक ०७/०६/२००० च्या शासन परिपत्रका अन्वये दिलेल्या निदेशांत सुधारणा करुन गृह विभाग शासन परिपत्रक क्र. सिटीएम १००९/प्र.क्र.६०१/विशा-१ब, दिनांक २३/११/२००९ अन्वये सुधारित परिपत्रक निर्गमित केले आहे.

तद्नंतर, दिनांक २३/११/२००९ अन्वये निर्गमित केलेल्या शासन परिपत्रकातील निदेशांमध्ये किरकोळ सुधारणा करुन गृह विभाग शासन परिपत्रक क्र. सिटीएम १००९/प्र.क्र.६०१/विशा-१ब,दिनांक ०७/०५/२०१८ अन्वये सुधारित परिपत्रक निर्गमित केले आहे.

अनधिकृत धार्मिक स्थळांच्या बांधकामांना आळा घालण्यासाठी दिनांक ०७/०६/२००० अन्वये निर्गमित केलेल्या शासन परिपत्रकानुसार अंमलबजावणी करण्यात येत आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पुणे शहरातील महापालिकेच्या रुग्णालयामध्ये पुरेसे वैद्यकीय अधिकारी उपलब्ध नसल्याबाबत

**(२) ४१३०६ (१८-०६-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे शहरातील महापालिकेच्या रुग्णालयामध्ये पुरेसे वैद्यकीय अधिकारी उपलब्ध नसल्याने प्रशासनाने तज्ञ वैद्यकीय अधिकाऱ्यांची निवड केली मात्र महापालिकेच्या महिला व बालकल्याण समितीने हा विषय अद्यापही मान्य न केल्याने ही नियुक्त होऊ शकली नसल्याचे माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर रुग्णालयामधील वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या नियुक्तीचा प्रस्ताव महापालिकेच्या महिला व बालकल्याण समितीने मान्य न करण्याची कारणे काय आहे,

(३) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार वैद्यकीय अधिकारी नियुक्ती करण्यासंदर्भात कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०५-०७-२०१८) :** (१), (२) व (३)

- पुणे महानगरपालिका प्रशासनाकडील आरोग्य अधिकारी व वैद्यकीय अधिकारी अशी ११ पदे नामनिर्देशनाने भरण्याचे महानगरपालिकेकडून प्रस्तावित आहे.
- याबाबत जाहिरात प्रसिध्द केल्यानंतर कागदपत्रांची छाननी व मुलाखती अंती पात्र ७ पदांची निवड्यादी व अतिरिक्त निवड यादीस मान्यतेबाबतचा प्रस्ताव पुणे महानगरपालिकेच्या महिला व बालकल्याण समितीमार्फत मुख्य सभेच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता.
- सदर प्रस्तावास महिला व बालकल्याण समितीची मान्यता मिळाली नाही ही वस्तुस्थिती आहे.
- नियमित विहीत प्रक्रियेव्दारे निवड झालेल्या उमेदवारांना त्वरीत नियुक्ती आदेश देण्याबाबत पुणे महानगरपालिकेस सूचना देण्यात आल्या आहेत.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुणे शहरात डोंगरमाथा व अनेक भूभागावर बायो डायव्हर्सिटीझोन म्हणजे विविध जैव वनस्पती विभागांचे आरक्षण लागू करण्यात आल्याबाबत

**(३) ४१३११ (१८-०६-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे शहरात डोंगरमाथा व अनेक भूभागावर बायो डायव्हर्सिटीझोन म्हणजे विविध जैव वनस्पती विभागांचे आरक्षण लागू करण्यात आल्याबाबत लोकप्रतिनिधींनी दिनांक १५ मे, २०१८ रोजी वा त्यासुमारास मा.मुख्यमंत्री यांना लेखी निवेदन दिले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर निवेदनातील शासनाने बाबीनुसार फेरविचार करुन कोणता निर्णय घेतला वा घेण्यात येत आहे व त्यांचे स्वरूप काय आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०२-०७-२०१८) :** (१), (२) व (३) पुणे मनपाच्या क्षेत्रामध्ये प्रस्तावित शिवसृष्टी संदर्भात मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ०६/०२/२०१८ रोजी पुणे मनपा कडील पदाधिकारी व आमदार यांच्या समवेत बैठक झालेली होती. या बैठकीमध्ये पुणे शहरातील बीडीपी क्षेत्रात विकासावर कोणत्या स्वरूपाचे निर्बंध असावेत याबाबत मा.पालकमंत्री, पुणे यांचे अध्यक्षतेखाली सर्व आमदार व सर्व पक्षनेत्यांच्या बैठकीत चर्चा करून प्रस्ताव पाठवावा असा निर्णय झाला आहे. त्यानुसार दिनांक ०४/०५/२०१८ रोजी मा.पालकमंत्री, पुणे यांचे अध्यक्षतेखाली मा.खासदार, मा.आमदार व पक्षनेते व पदाधिकारी, पुणे मनपा यांचे समवेत बैठक झालेली असून या बैठकीमध्ये बीडीपी आरक्षणाकरीता जमीन क्षेत्राच्या ८% इतक्या प्रमाणात टीडीआर अनुज्ञेय करण्याबाबत प्रस्तावित करण्यात आलेले आहे. सदर प्रस्ताव त्याबरोबर लोकप्रतिनिधी यांनी दिलेली निवेदने जोडून पुणे महानगरपालिकेने शासनाकडे दिनांक ०१/०६/२०१८ अन्वये प्रस्ताव सादर केलेला आहे. सदर प्रस्तावाबाबत शासनस्तरावर निर्णय घेण्याची प्रक्रिया कार्यवाहीमध्ये आहे.

---

## मुंबई महानगरपालिकेच्या विकास आराखड्यामध्ये विकासकांना जादा चटई क्षेत्र (एफएसआय) देवून गैरव्यवहार केल्याबाबत

**(४) ४१३४२ (२१-०६-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे, श्री.अमरिशभाई पटेल, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.हरिसिंग राठोड, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड, प्रा.जोगेन्द्र कवाडे, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.चंद्रकांत रघुवंशी :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई महानगरपालिकेच्या सन २०१४-२०३४ या कालावधीकरीता मंजूर केलेल्या विकास आराखड्यामध्ये विकासकांना परवडणाऱ्या घरांसाठी जादा चटई क्षेत्र (एफएसआय) दिल्यामुळे सुमारे ५० हजार कोटी रुपयांचा गैरव्यवहार झाल्याचे माहे डिसेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे तसेच

माहे मे, २०१८ च्या तिसऱ्या आठवड्याच्या उक्त प्रकरणी मा.लोकायुक्तांनी लाचलुचपत प्रतिबंधक विभागाला चौकशीचे आदेश दिलेले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर आराखड्यानुसार ३० टक्के जमीन परवडणाऱ्या घरांसाठी, ३० टक्के जमीन मोकळया जागांसाठी आणि ३० टक्के जमीन विकासकांसाठी दिली जाणार असल्याने २ तृतीयांश जमीन विकासकांना गैरमार्गाने उपलब्ध करुन देण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी मुंबईच्या "हमारा शहर मुंबई अभियान" तसेच "सिटीझन सिव्हिक सोल्युएशन फाऊंडेशन" यांनी नगरविकास विकास विभागाकडे तक्रारी केल्या असून सदर विकास आराखड्याप्रमाणे विकास झाला तर मुंबईत ट्रॅफीक जॅम, प्रदुषण वाढून नागरिकांचे आरोग्य धोक्यात येण्याचा तसेच समुद्राच्या पाण्याची पातळी वाढवुन मुंबईला धोका उत्पन्न होण्याची शक्यता निर्माण झाली असल्यामुळे "कन्झरवेशन ॲक्शन ट्रस्ट" यांनी शासनाकडे तक्रार केली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर तक्रारीच्या अनुषंगाने शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे तसेच उक्त विकास आराखड्याचा पुनर्विचार करावा अशी जनमानसातून मागणी होत असल्यामुळे मागणीच्या अनुषंगाने आराखड्याचा पुनर्विचार करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०९-०७-२०१८) :** (१) अशी बाब नाही. शासन अधिसूचना दिनांक ०८/०५/२०१८ द्वारे बृहन्मुंबई विकास योजना-२०३४ सह विकास नियंत्रण नियमावलीस शासनाने मंजूर दिली असून सदर अधिसूचनेस दिनांक २२/०६/२०१८ व दिनांक २९/०६/२०१८ रोजी शुध्दीपत्रके काढण्यात आली आहेत. त्यानुसार मंजूर विकास योजना सह विकास नियंत्रण नियमावली दिनांक ०१/०९/२०१८ पासून अंमलात येणार आहे. सदरहू प्रश्नात उपस्थित केलेल्या मुदयाच्या अनुषंगाने मा.लोकआयुक्त कार्यालयाकडून प्राप्त माहितीनुसार बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या अधिकाऱ्यांनी ५० हजार कोटी रुपयांच्या चटई

क्षेत्राचा घोटाळा केल्याबाबत श्री.प्रमोद मुझुमदार यांनी दिनांक २८/०९/२०१६ रोजी लोकआयुक्त कार्यालयाकडे तक्रार दाखल केली असून मा.लोकआयुक्त यांचेसमोर प्राथमिक चौकशी सुरु असल्याचे मा.लोकआयुक्त कार्यालयाने कळविले आहे.
(२) अशी बाब नाही. बृहन्मुंबई विकास योजना-२०३४ सह विकास नियंत्रण नियमावलीस शासनाने मंजूरी दिली असून विकास नियंत्रण व प्रोत्साहन नियमावलीच्या विनियम ३३(८) अन्वये विशेष विकास क्षेत्रातील फक्त ४१ ते ४३ टक्के जमीन ही विकासकास विकासाकरीता उपलब्ध होईल. परवडणारे गृहनिर्माण यांचेकरीता ३० टक्के जमीन तसेच मोकळ्या जागेची १५ टक्के व इतर सुविधाकरीता भूखंडाचे एकूण क्षेत्रफळानुसार १२ किंवा १४ टक्के जमीन म्हणजेच ५७ ते ५९ टक्के जमीन तसेच याशिवाय रस्त्याचा भागही महानगरपालिकेस हस्तांतरीत करावा लागेल. सदर बदल हा सारभूत स्वरुपाचा असल्यामुळे मंजूर विकास नियंत्रण व प्रोत्साहन नियमावलीच्या मंजूरीमधून वगळलेल्या भागामध्ये आहे. त्यावर शासनाने दिनांक ०८/०५/२०१८ रोजीचे सूचनेन्वये प्रस्तावित सारभूत फेरबदलावर हरकती / सूचना मागविण्यात आल्या असून फेरबदलाची वैधानिक कार्यवाही पूर्ण होऊन शासनाची मंजूरी मिळाल्यानंतर सदर तरतूद अंमलात येणार आहे.
(३), (४) व (५) प्रारुप विकास योजनेसंदर्भात महानगरपालिकास्तरावर प्राप्त हरकती/ सूचना, नियोजन समितीचे अभिप्राय, त्यावरील नियोजन प्राधिकरणाचे अभिप्राय, शासनस्तरावर प्राप्त हरकती/ सूचना यांचा सर्वंकष विचार करुन शासनाने दिनांक ०८/०५/२०१८ रोजीचे अधिसूचनेद्वारे प्रारुप विकास योजना-२०३४ ला मंजूरी दिली आहे.

---

## नागपूर शहरात माहे एप्रिल, २०१८ महिन्यात हत्या झाल्याबाबत

**(५) ४१३४९ (२१-०६-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर शहरात माहे एप्रिलमध्ये अकरा दिवसात तब्बल ८ हत्या झाली असून नंदनवन परिसरातील पैथर नगरमध्ये दिनांक २६ एप्रिल, २०१८ रोजी तडीपार गुंड राहुल पावस्करची भोसकून हत्या, दिनांक ३० एप्रिल, २०१८ रोजी

गुरुदेवनगर मधील पंचशील पेट्रोलपंपावर दरोडा टाकून दरोडेखोरांनी नूर खान या सुरक्षा रक्षकाची केलेली हत्या, दिनांक १ मे, २०१८ रोजी रामनगर मध्ये कर्नाटक संघासमोर रज्जू यादव या ३३ वर्षीय इसमाची फेरीवाला आणि त्याच्या सहकाऱ्यांने पैशाच्या वादातून डोक्यावर सत्तूरनेवार करुन भरदिवसा केलेली हत्या, दिनांक ४ मे, २०१८ ला एमआयडीसी परिसरात आयसी चौकात श्रीकांत गुहे या २२ वर्षीय गुन्हेगाराची टोळी युध्दातून हत्या, दिनांक ५ मे, २०१८ रोजी गौडखोरी गावात जिल्हा परिसर शाळेत नंदू भोसले या २२ वर्षीय तरुणाची अज्ञात मारेकरीकडून तीक्ष्ण हत्याराने वार करुन हत्या आणि दिनांक ६ मे, २०१८ रोजी दुबेनगर परिसरातील एका बागेत पैशाच्या वादातून अमोल गिरधारी भैंडारकरची हत्या झाल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नागपूर शहरात कायदा व सुव्यवस्थेचा गंभीर प्रश्न निर्माण झाला असून उक्त शहरामध्ये मोठ्या प्रमाणात वाढलेल्या गुन्ह्यांबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुषंगाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१०-०७-२०१८) :** (१) राहूल पावसकर खुन प्रकरणी नंदनवन पोलीस स्टेशन, नागपूर येथे ४ आरोपीविरूद्ध गु.र.नं. ३०२/२०१८ भादंवि कलम ३०२, १२० ब,३४ आरडब्ल्यु ४, २५ भाहका १३५ मुपोका अन्वये गुन्हा नोंद करून ३ आरोपींना अटक करण्यात आली आहे.

सुरक्षा रक्षक नूर खान खून प्रकरणी नंदनवन पोलीस स्टेशन, नागपूर येथे ८ आरोपीविरूद्ध गु.र.नं. ३११/२०१८ भादंवि कलम ३९६, २०१ अन्वये गुन्हा नोंद करून सर्व ८ आरोपींना अटक करण्यात आली आहे.

राजेश ऊर्फ रज्जु यादव खून प्रकरणी अंबाझरी पोलीस स्टेशन, नागपूर येथे २ आरोपीविरूद्ध गु.र.नं. ८६/२०१८ भादंवि कलम ३०२, ३४ अन्वये गुन्हा नोंद करून दोन्ही आरोपींना अटक करण्यात आली आहे.

श्रीकांत रमेश गुहे खून प्रकरणी एमआयडीसी पोलीस स्टेशन, नागपूर येथे ८ आरोपींविरूद्ध गु.र.नं. १९०/२०१८ भादंवि कलम ३०२, ३४ अन्वये गुन्हा नोंद करून सर्व ८ आरोपींना अटक करण्यात आली आहे.

नंदू भोसले खून प्रकरणी कळमेश्वर पोलीस स्टेशन, नागपूर (ग्रामीण) येथे ८ आरोपींविरूद्ध गु.र.नं. ३५४/२०१८ भादंवि कलम ३०२, २०१, १२०(ब) सह कलम ४/२५ आर्म ॲक्ट अन्वये गुन्हा दाखल करून सर्व ८ आरोपींना अटक करण्यात आली असून आहे.

अमोल भेंडारकर खून प्रकरणी हुडकेश्वर पोलीस स्टेशन, नागपूर येथे एका आरोपीविरूद्ध गु.र.नं. २९१/२०१८ भादंवि कलम ३०२ अन्वये गुन्हा नोंद करून आरोपीस अटक करण्यात आली आहे. उपरोक्त ६ गुन्हे तपासावर आहेत.

(२) नागपूर शहर पोलीस आयुक्तालयांतर्गत पोलीस ठाणे कार्यक्षेत्रात जानेवारी ते मे, २०१८ आणि जानेवारी ते मे, २०१७ चा गुन्हे सांख्यिकी तक्ता खालीलप्रमाणे आहे. सदर आकडेवारीचे अवलोकन केले असता गुन्हयांमध्ये लक्षणीय घट दिसून येते. यावरुन नागपूर शहरात कायदा व सुव्यस्थेचा गंभीर प्रश्न निर्माण झाला आहे हे खरे नाही.

| अ.क्र. | गुन्हे शिर्ष | जानेवारी ते मे २०१७ अखेर | | जानेवारी ते मे २०१८ अखेर | | घट/वाढ |
|---|---|---|---|---|---|---|
| | | दाखल | उघड | दाखल | उघड | |
| १. | खून | ३८ | ३५ | ३१ | ३० | -७ |
| २. | खूनाचा प्रयत्न | ४५ | ४३ | २० | १९ | -२५ |
| ३. | चेन स्नॅचिंग | ३६ | ६ | १६ | ३ | -२० |
| ४. | जबरी चोरी | १०७ | ६५ | ७१ | ४५ | -३६ |
| ५. | घरफोडी | ४४८ | ९९ | ३७० | ९१ | -७८ |
| ६. | एकूण चोरी | १३६९ | ३४२ | १०८५ | २९२ | -२८४ |
| ७. | वाहन चोरी | ७१० | १६६ | ५९५ | १३५ | -११५ |
| ८. | इतर चोरी | ६५९ | १७६ | ४९० | १५७ | -१६९ |
| ९. | खंडणी | ३१ | ३१ | १५ | १५ | -१६ |
| १०. | विश्वासघात | २७ | २६ | १९ | १६ | -८ |
| ११. | पळवून नेणे | २१८ | १६३ | २१४ | १६० | -४ |
| १२. | बलात्कार | ६८ | ६७ | ६८ | ६७ | ० |
| १३. | विनयभंग | १६९ | १६३ | १५८ | १५१ | -११ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १४. | विवाहीत स्त्रीयांचे छळ | १०२ | १०२ | ५६ | ५६ | -४६ |
| १५. | भाग १ ते ५ सदराखालील एकूण गुन्हे | ४०८२ | २३१० | ३६०८ | २१८५ | -४७४ |

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुणे शहरातील जनवाडी पोलीस स्टेशनमध्ये मुलाला मारहाण झाल्याने वडिलांचा मृत्यू झाल्याबाबत

**(६) ४१३५४ (०८-०६-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे, ॲड.अनिल परब :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे शहरातील जनवाडी पोलीस स्टेशनमध्ये श्री.अमोल मेंगडे यास एका प्रकरणात दिनांक ६ मे, २०१८ रोजी पोलिसांनी चौकशीसाठी बोलाविल्यानंतर त्याला पट्ट्याने मारहाण करण्यात आल्याचा धक्का सहन न झाल्याने सदर मुलाचे वडिल श्री.मोरेश्वर काळूराम मेंगडे (वय वर्षे ६१) रा.गोपाळकृष्ण मंदिराजवळ, गोखलेनगर यांचा मृत्यू झाल्याची घटना माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान घडल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, श्री.मेंगडे यांच्या मृत्यूप्रकरणी पोलिसांवर कारवाई करण्याबाबतची मागणी स्थानिक लोकप्रतिनिधींनी केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व त्यानुसार जबाबदार असणाऱ्या पोलीस उपनिरीक्षकांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१०-०७-२०१८) :** (१) अमोल मेंगडे यास एका मारहाणीच्या प्रकरणात चौकशीसाठी दिनांक ०६/०५/२०१८ रोजी चतुश्रृंगी पोलीस स्टेशन येथे बोलावले असताना आणि त्याची चौकशी चालू असताना अमोल मेंगडे याचे वडील

श्री.मोरेश्वर मेंगडे तेथे आले. तथापि, अमोल मेंगडे याची चौकशी चालू असल्यामुळे त्यांना तेथून बाहेर जाण्यास सांगितले. श्री.मोरेश्वर मेंगडे पोलीस स्टेशनमधून बाहेर गेले असताना ते चक्कर येऊन खाली पडले नंतर त्यांना उपचारासाठी रूग्णालयात नेले आणि त्यांच्या उपचार चालू असताना त्यांचा मृत्यू झाला सदर मृत्यू वैद्यकीय अधिकारी यांचे अंतिम अहवालानुसार हृदयविकारामुळे झाल्याचे नमूद केले आहे. सदर प्रकरणी चतुश्रृंगी पोलीस स्टेशन, पुणे येथे अकस्मात मयत रजिस्टर नं. ९९/२०१८ सी.आर.पी.सी. १७४ प्रमाणे अकस्मात मयत दाखल करण्यात आले.

(२) होय, हे खरे आहे.

(३) सदर प्रकरणी मा.लोकप्रतिनिधीच्या निवेदनाच्या अनुषंगाने सहायक पोलीस आयुक्त, चतुश्रृंगी विभाग, पुणे शहर यांचेकडून चौकशी करण्यात आली असून सदर चौकशीमध्ये अमोल मेंगडे यास पोलीस उपनिरीक्षकाने कोणतीही मारहाण केली नसल्याचे दिसून आले आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात सर्व शिक्षा अभियानांतर्गत देण्यात येणाऱ्या शालेय पोषण आहारातील अन्नधान्याच्या बारदानात गैरव्यवहार झाल्याबाबत

**(७) ४१३९६ (१५-०६-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात सर्व शिक्षा अभियानांतर्गत सर्व व्यस्थापनाच्या शाळेतील इयत्ता १ ली ते ८ वी पर्यंतच्या मुलांना मोफत शालेय पोषण आहार दिला जात असून सदर शालेय पोषण आहारापोटी मिळणाऱ्या तांदूळ बारदानाचा सन २०१२ पासून हिशोब मिळण्यासाठी शिक्षण संचालक यांनी दिनांक २० एप्रिल, २०१८ रोजी पत्र निर्गमित केले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शाळांमधील मुलामुलींना सकस आहार मिळावा याकरीता पोषण आहारात मुलामुलींना खिचडी शिजवून देण्याकरीता त्या शाळातील व्यवस्थापक काटेकोरपणे देखरेख करीत असून केवळ शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना त्रास

देण्याकरीता सन २०११-१२ पासुन वापरण्यात आलेल्या अन्नधान्याच्या रिकाम्या बारदानाचा हिशोब मागितला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, मागील ६ ते ७ वर्षापुर्वी वापरण्यात आलेल्या बारदानाचा हिशोब जुळत नसल्यामुळे शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना दोषी ठरविण्यात आल्याने कर्मचाऱ्यांमध्ये शासनाच्या धोरणाविषयी संभ्रम निर्माण झाला असून सदर परिपत्रक रद्द करण्याबाबत विविध शिक्षक संघटना यांच्याकडून मागणी करण्यात येत आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०६-०७-२०१८) :** (१), (२), (३) व (४) शालेय पोषण आहार योजनेंतर्गत धान्याची रिकामी बारदाणे, तेलाचे डबे इ. साहित्य मोठ्या प्रमाणात शिल्लक राहत असल्याने सदर साहित्याचे निर्लेखन करुन यामधून जमा होणारा निधी शासनास जमा करण्याचे निर्देश माहे डिसेंबर, २०१२ मध्ये देण्यात आले होते. भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांच्या सन २०१६ च्या अहवालामध्ये या आदेशाची अंमलबजावणी न केल्याने शासनाचे आर्थिक नुकसान झाल्याबाबत मुद्या उपस्थित केला आहे. त्यामुळे याबाबतची माहिती लोकलेखा समितीस सादर करावयाची असल्याने दिनांक २०/०४/२०१८ च्या पत्रान्वये माहिती सादर करण्याचे निर्देश सर्व जिल्हयांना दिलेले आहेत.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मालाड, मुंबई येथील शिवसेनेचे माजी उप शाखाप्रमुख श्री.सचिन सावंत यांची हत्या करण्यात आल्याबाबत

**(८) ४१४५२ (२१-०६-२०१८). ॲड.अनिल परब :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईमधील मालाड येथील शिवसेनेचे माजी उप शाखाप्रमुख श्री.सचिन सावंत (वय वर्षे ४६) यांची रात्री भररस्त्यात गोळीबार करुन हत्या करण्यात आल्याचे

दिनांक २२ एप्रिल, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी करुन हत्येस कारणीभूत असणाऱ्या मारेकऱ्यांना अटक करण्याबाबत तसेच त्यांच्याविरुध्द गुन्हा नोंदविण्याबाबत कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०६-०७-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) सदर प्रकरणी कुरार पोलीस ठाणे येथे गु.र.क्र. २४९/२०१८ कलम ३०२, ३०७, १२० (ब), ३४ भा.दं.वि. सह कलम ३, २५, २७ भाहका अन्वये गुन्हा दाखल करण्यात आला आहे. सदर गुन्ह्यात एकूण ७ आरोपींना अटक करण्यात आली असून गुन्हा तपासावर आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पंतप्रधान आवास योजनेशी सुसंगत झोपडीधारकांना घरे देण्यासाठी गठीत केलेल्या समितीच्या अहवालाबाबत

**(९) ४१४६६ (२१-०६-२०१८). ॲड.अनिल परब, श्री.रविंद्र फाटक : तारांकित प्रश्न क्रमांक ३७९८६ ला दिनांक ७ मार्च, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पंतप्रधान आवास योजनेशी सुसंगत झोपडीधारकांना घरे देण्यासाठी दिनांक ९ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास उच्चस्तरीय समिती स्थापन केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर समितीला अहवाल सादर करण्यासाठी तीन महिन्याची मुदत देण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर समितीचा अहवाल शासनास प्राप्त झाला आहे काय, अहवालातील शिफारशीचे स्वरुप काय आहे व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत तसेच किती कालावधीत अहवाल प्राप्त होण्याचे अपेक्षित आहे ?

**श्री.प्रकाश महेता (०२-०७-२०१८) :** (१) होय. हे खरे आहे.

झोपडपट्टीधारकांना अधिक आकारमानाची घरे देण्याच्या अनुषंगाने त्याचा मंजूर तथा चालू झोपडपट्टी पुनर्वसन योजनांवर होणारा परिणाम अभ्यासण्यासाठी दिनांक १०/०१/२०१८ च्या शासन निर्णयान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली आहे

(२), (३) व (४) होय, हे खरे आहे. सदर समितीस विश्लेष्णात्मक अहवाल (Impact Analysis) सादर करण्यासाठी मुदतवाढ देण्यात आली असून सदर समितीच्या ४ बैठका संपन्न झाल्या आहेत. विश्लेष्णात्मक अहवाल (Impact Analysis) तयार करण्याचे काम अंतिम टप्प्यात आले असल्याचे मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण यांनी कळविले आहे.

सदर समितीचा अहवाल शासनास प्राप्त झाल्यानंतर पुढील कार्यवाही करण्यात येईल.

---

## अहमदनगर जिल्ह्यातील माळीवाडा येथील श्री.कैलास रामभाऊ गिरवले यांचा पोलीस मारहाणीत मृत्यू झाल्याबाबत

**(१०) ४१४९२ (१९-०६-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.किरण पावसकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अहमदनगर जिल्ह्यातील माळीवाडा येथील श्री.कैलास रामभाऊ गिरवले यांचा पोलीस मारहाणीत माहे एप्रिल, २०१८ मध्ये वा त्यादरम्याप मृत्यू झाला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सर्वोच्च न्यायालयाने कोठडी मृत्यूबाबत दिलेल्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे जिल्हा दंडाधिकारी यांच्यामार्फत उक्त प्रकरणी चौकशी करण्यात आली आहे काय तसेच राष्ट्रीय मानवी हक्क आयोग व राज्य मानवी हक्क आयोगाकडे यासंदर्भातील अहवाल पाठविण्यात आला आहे काय,

(३) असल्यास, प्राथमिक चौकशीतील निष्कर्ष काय आहेत, निष्कर्षानुसार संबंधित पोलीस अधिकारी व कर्मचारी यांच्याविरुध्द कोणती कारवाई करण्यात आली वा येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०२-०७-२०१८) :** (१) मयत कैलास गिरवले हा कोतवाली पोस्टे गु.र.क्र. ३७/१८ महाराष्ट्र दारुबंदी क्र. ६५ (ई) मध्ये न्यायालयीन कोठडीत असताना त्यांना दिनांक १५/०४/२०१८ रोजी सकाळी ९.०० वा. चे सुमारास छातीत दुखत असल्याने व रक्तदाबाचा त्रास होऊ लागल्याने त्यांना प्रथम सिव्हील हॉस्पिटल, अहमदनगर येथे औषधोपचार कामी दाखल केले होते. तेथील डॉक्टरांनी प्राथमिक उपचार केले व पेशंटला तात्काळ ससुन हॉस्पिटल, पुणे येथे दाखल करण्याबाबत कळविले. त्यावरुन त्यास त्याचे नातेवाईकांसह ॲम्ब्युलन्स मधुन ससुन हॉस्पिटल येथे दाखल केले. तेथे त्याच्यांवर उपचार सुरु असताना त्यांचे दिनांक १६/०४/२०१८ रोजी २०.५० वा. निधन झाले.

सदर घटनेचा तपास राज्य गुन्हे अन्वेषण विभाग यांच्यामार्फत करण्यात येत असून मयत गिरवले यांचा पोलीस मारहाणीत मृत्यू झाला हे अद्यापर्यंतच्या तपासात निष्पन्न झाले नाही.

(२) मयत कैलास गिरवले यांचे न्यायालयीन कोठडी मृत्यूबाबतचा अहवाल राष्ट्रीय मानव अधिकार आयोग, नवी दिल्ली व राज्य मानवी हक्क आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई व मा.जिल्हादंडाधिकारी, अहमदनगर यांना पोलीस अधीक्षक, अहमदनगर यांचेकडून दिनांक १७/०४/२०१८ रोजी सादर करण्यात आला आहे.

(३) व (४) सदर घटनेचा तपास राज्य गुन्हे अन्वेषण विभाग यांच्यामार्फत करण्यात येत आहे.

---

## जिल्हा परिषद माढा या शाळेतील शिक्षकांचे वेतन अदा करण्याबाबत

**(११) ४१५७२ (१४-०६-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सोलापूर जिल्हा परिषदेमार्फत सुरु असणारी जिल्हा परिषद माढा ही एकमेव माध्यमिक शाळा असून सदर शाळेतील शिक्षकांचे वेतन हे जिल्हा परिषदेच्या विशेष फंडातून केले जाते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शिक्षकांच्या वेतनासाठी शालार्थ वेतन प्रणाली सुरु झाल्यानंतर सदर माध्यमिक शाळेचे वेतन शालार्थ वेतन प्रणालीमार्फत काढले जात नसल्याने माहे ऑक्टोबर, २०१७ पासून या शाळेतील शिक्षकांना विविध आर्थिक समस्यांना सामोरे जावे लागत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर शाळेतील शिक्षकांचे माहे ऑक्टोबर, २०१७ पासूनचे वेतन ऑफलाईन पद्धतीने अदा करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (३०-०६-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) हे खरे आहे.
(३) जिल्हा परिषद माढा या शाळेतील शिक्षकांचे सप्टेंबर, २०१७ पासून ते जुलै, २०१८ पर्यंतचे वेतन अदा करण्याबाबत दिनांक २२/०५/२०१८ च्या पत्रान्वये आदेश देण्यात आले असून वेतन अदा करण्याची कार्यवाही सुरु आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## माध्यमिक शाळेतील शिक्षकांचे वरिष्ठ व निवडश्रेणीचे प्रशिक्षण सुरु करण्याबाबत

**(१२) ४१५७३ (१९-०६-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक ३७७७३ ला दिनांक ९ मार्च, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यामध्ये ज्या शासकीय कर्मचाऱ्यांना पदोन्नतीचे मार्ग बंद आहे त्यांना शासनाची आश्वासित प्रगती योजना अस्तित्वात असणे या धोरणानुसार १२ वर्षानंतर वेतनवाढ, वरिष्ठ वेतनश्रेणी, २४ वर्षानंतर निवडश्रेणी निवडक कर्मचाऱ्यांना मिळणे असे असतानाही खाजगी व्यवस्थापनातील शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सदर योजना लागू नसणे हा त्यांच्यावर अन्याय होत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, माध्यमिक शाळेतील शिक्षकांना १२ वर्षानंतर देण्यात येणारी वरिष्ठश्रेणी व २४ वर्षानंतरची निवडश्रेणी सेवांतर्गत प्रशिक्षण करण्याच्या अटीवर देण्यात येते परंतु सेवा पूर्ण झालेल्या माध्यमिक शिक्षकांच्या वरिष्ठ व निवड वेतनश्रेणीच्या प्रशिक्षणाचे आयोजन मागील २ ते ३ वर्षापासून शासनाकडून करण्यात आले नसल्याचे माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(३) तसेच निवडश्रेणी प्रशिक्षण आयोजित न केल्यामुळे शिक्षकांना आर्थिक नुकसान व मानसिक त्रास होत असून काही शिक्षक २४ वर्षाची सेवा करुनही निवडश्रेणी न मिळता सेवानिवृत्त झाले आहेत, अशा शिक्षकांना शासन १०० रुपयाच्या स्टॅम्प पेपरवर प्रशिक्षण करणाऱ्या अटीस अधीन राहून निवडश्रेणी देणार आहे काय,

(४) असल्यास, शासनाने वरिष्ठश्रेणी/निवडश्रेणी सेवांतर्गत प्रशिक्षण देण्याबाबत मुख्याध्यापक संघाच्या प्रतिनिधींनी शिक्षण संचालक, पुणे व उपसंचालक, शिक्षण विभाग, मुंबई व पुणे यांच्याकडे माहे मे, २०१८ मध्ये निवेदन देऊन प्रशिक्षण सुरु करण्याची मागणी केली, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन वरिष्ठश्रेणी/निवडश्रेणी सेवांतर्गत प्रशिक्षण देण्याबाबत तसेच खाजगी व्यवस्थापनातील शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना १२ वर्षानंतर वेतनवाढ व २४ वर्षानंतर निवडश्रेणी देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०७-०७-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

खाजगी व्यवस्थापनातील शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना वरिष्ठ वेतनश्रेणी देण्याबाबतची कालबध्द पदोन्नती योजना लागू आहे. सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना लागू करण्यासाठी शासन स्तरावर कार्यवाही सुरु आहे.

(२) हे खरे नाही.

फक्त सन २०१७-१८ मध्ये प्रशिक्षण झालेले नाही.

(३) हे खरे नाही.

(४) हे खरे नाही.

(५) माहिती तंत्रज्ञानाचा वापर करुन नवीन प्रशिक्षण घटकसंच तयार करुन या वर्षापासून प्रशिक्षण आयोजित करण्यात येत आहे.
(६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## महाराष्ट्र कर्नाटक सीमा लगत भागातील गावांमध्ये मराठी माध्यमांच्या शाळा स्थापन करण्याबाबत

**(१३) ४१५७७ (१९-०६-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील** : सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात सांगली, कोल्हापूर व सोलापूर या जिल्ह्यांना कर्नाटक सीमा भाग असून या सीमावर्ती भागातील जत तालुक्यातील मोरबगी, हल्ली, तिकुंडी, गुगलवाड, बाळागाव या गावांमध्ये तसेच अनेक गावांमध्ये मराठी माध्यमाची शाळा नसल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर गावांमध्ये मराठी माध्यमाची शाळा नसल्याने कन्नड माध्यमातून या गावातील मुलांचे शिक्षण दिले जात असून सदर सीमावर्ती भागातील मराठी माध्यमाच्या शाळा स्थापन करण्याबाबत शासनाकडे स्थानिक नागरिक व लोकप्रतिनिधी यांच्याकडून मागणी केली जात आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन उक्त सीमावर्ती भागात मराठी माध्यमाच्या शाळा स्थापन करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०७-०७-२०१८)** : (१) व (२) अंशत: खरे आहे.
(३) व (४) सिमावर्ती भागात मराठी माध्यमाच्या शाळा सुरु करण्याची बाब तपासण्यात येत आहे.

---

## मुंबईतील बारा उपनगरीय रुग्णालयातील आयसीयू विभागाचे खाजगीकरण करण्यात आल्याबाबत

**(१४) ४१५८८ (०८-०६-२०१८). श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, ॲड.राहुल नार्वेकर, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.रामनिवास सिंह, श्रीमती स्मिता वाघ** : सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील महानगरपालिका रुग्णालयातील डॉक्टरांच्या अपुऱ्या संख्येवर उपाय म्हणून बारा उपनगरीय रुग्णालयातील अतिदक्षता विभाग खाजगी संस्थाना कंत्राटी पद्धतीने देण्याचा निर्णय महापालिकेने घेतला असल्याचे माहे एप्रिल, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर रुग्णालयात डॉक्टर मिळत नसल्याने खाजगीकरण करण्यात आले असून सदर रिक्त पदे दहा महिन्यात भरण्यात येणार असल्याचे निदर्शनास आले असून उक्त पदे भरण्यात आल्यानंतर खाजगीकरणाबाबत महानगरपलिकेचे ध्येयधोरणे काय आहेत,

(३) असल्यास, खाजगीकरणामुळे उपचाराचा खर्च वाढणार असून त्याचा भार गरीब व गरजू रुग्णांवर पडणार असल्यामुळे डॉक्टरांची रिक्त पदे भरून गरीब व गरजू रुग्णांना माफक दरात उपचार उपलब्ध करून देण्यासाठी शासनाने महापालिकेला निर्देश दिले आहेत काय,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०६-०७-२०१८)** : (१) बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या १२ रुग्णालयांमध्ये अतिदक्षता विभागातील फक्त विशेषज्ञ (Intensivists) डॉक्टरांच्या सेवा बाह्यस्त्रोतीकरणाद्वारे उपलब्ध करुन देण्याचा निर्णय महानगरपालिकेमार्फत घेण्यात आला आहे.

(२) उपनगरीय रुग्णालयांच्या अतिदक्षता विभागातील निवासी वैद्यकीय अधिकाऱ्यांची पदे सोडून जाण्याचे प्रमाण जास्त आहे. रुग्णांना सातत्यपूर्व उच्च दर्जाची सेवा देणे शक्य व्हावे याकरीता बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत बाह्यस्त्रोतीकरणाद्वारे विशेषज्ञ (Intensivists) डॉक्टरांच्या सेवा दोन वर्षाच्या कालावधीकरीता उपलब्ध करून देण्यासाठी निविदा काढण्यात आली आहे.

सदर कंत्राट कालावधी पूर्ण झाल्यावर अतिदक्षता विभागातील निवासी वैद्यकीय अधिकाऱ्यांची पदे प्रचलित पध्दतीने बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत भरण्यात येणार आहेत.

(३) व (४) अतिदक्षता विभागात दाखल रुग्णांना सुपर स्पेशालिटी विभागाच्या सेवांकरीता आकारण्यात येणारे दर हे महानगरपालिकेच्या प्रचलित दराप्रमाणे कायम असून त्यामध्ये कोणतीही वाढ करण्यात आलेली नाही.

---

## मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने (एमएमआरडीए) पायाभूत सुविधा प्रकल्पासाठी नेमलेल्या सल्लागारावर शुल्कापोटी करण्यात आलेला खर्च वाया गेल्याबाबत

**(१५) ४१५९० (०८-०६-२०१८). श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.धनंजय मुंडे, श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.रामराव वडकुते, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने (एमएमआरडीए) कल्याण, उल्हासनगर, बदलापूर, अंबरनाथ येथील पायाभूत सुविधा प्रकल्पासाठी नेमलेल्या सल्लागारावर शुल्कापोटी करण्यात आलेला ४ कोटी १५ लाख रुपयांचा खर्च वाया गेल्याचा निष्कर्ष भारताचे नियंत्रक व महालेखा परिक्षकांनी (कॅग) आपल्या अहवालात काढला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त सल्लागाराची नियुक्ती कोणत्यात प्रकल्पाच्या कामासाठी करण्यात आली असून सदर सल्लागाराच्या नियुक्तीसाठी कोणत्या अटी व शर्थी निश्चित करण्यात आल्या होत्या, तसेच उक्त प्रकल्पाच्या कामास एमएमआरडीएच्या नियोजन विभागाची संमती घेण्यात आली होती काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०३-०७-२०१८) :** (१), (२), (३) व (४) विस्तारीत पायाभूत सुविधा प्रकल्प अंतर्गत कल्याण शहर वळण रस्ता बांधणे, राज्यमार्ग ४० वरील शिरगाव फाटा ते राष्ट्रीय महामार्ग क्र. ३ पडघा ते टिटवाळा राष्ट्रीय महामार्ग क्र. २२२ ते कल्याण कर्जत राज्यमार्ग ३५ वरील बदलापूर पर्यंत चौपदरी रस्त्याचे बांधकाम व भूसंपादन करणे, टक्का कॉलनी - पळस्पे फाटा आणि कळंबोली ते खांदा कॉलनी, खोपोली शहर वळण रस्ता, रेवस कारंजा रस्त्यावर रेवस खाडीवर पुलाचे बांधकाम, भिवंडी वळण रस्त्याचे बांधकाम, नेरळ ते दस्तुरी रस्त्याची सुधारणा, दस्तुरी माथेरान या पथमार्गाचे सुशोभिकरण करणे अशा कामाकरीता निविदापूर्व कामे व भूसंपादन करण्याबाबत प्रकल्प व्यवस्थापन करण्यासाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या कार्यकारी समितीने दिनांक २८ जानेवारी, २०१३ रोजीच्या २३७ व्या बैठकीत सल्लागार नियुक्तीस मंजूरी दिली होती. तसेच, प्राधिकरणाच्या दिनांक २७/०६/२०१४ च्या १३४ व्या बैठकीमध्ये उक्त प्रकल्पाच्या बांधकामास मंजुरी देण्यात आली आहे.

दिनांक १३/०४/२०१८ रोजीच्या पत्रान्वये मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने सादर केलेल्या उत्तराच्या अनुषंगाने सल्लागाराच्या शुल्कापोटी रुपये ४.१५ कोटी वाया गेल्याच्या निष्कर्षाबाबतचा मुद्दा निरीक्षण अहवालातून लोकलेखा समितीपुढील चर्चेच्या अधिन राहून मा.प्रधान महालेखाकार यांनी निकाली काढलेला आहे.

---

## मुंबईतील दहिसर येथील आनंदनगर मधील महानगरपालिका रूग्णालयात सोयी-सुविधांचा अभाव असल्याबाबत

**(१६) ४१६३६ (१८-०६-२०१८). श्री.प्रसाद लाड, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, श्री.ख्वाजा बेग, श्री.किरण पावसकर, श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील दहिसर येथील आनंदनगर मधील महानगरपालिका रूग्णालयात सोयी-सुविधांचा अभाव असल्याने रूग्णांना अनेक अडचणींचा सामना करावा लागत असून सदर रुग्णालयात लिफ्ट बंद असणे, पायऱ्या तुटलेल्या असणे

तसेच सुरक्षा रक्षकही नसल्याची बाब दिनांक ११ एप्रिल, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने रुग्णालयाची पहाणी वा चौकशी केली आहे काय, चौकशीचे निष्कर्ष काय आहेत व सदर रुग्णालयात रुग्णांना सर्व सोयीसुविधा तात्काळ उपलब्ध होण्यासाठी कोणती कार्यवाही वा उपाययोजना करण्यात आली वा येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०६-०७-२०१८) :** (१), (२) व (३) आनंदनगर, दहिसर (पूर्व), मुंबई येथे बृहन्मुंबई महानगरपालिकेचे रुग्णालय नसून इमारतीच्या पहिल्या मजल्यावर महानगरपालिकेचा दवाखाना व आरोग्य केंद्र कार्यरत आहे.

सदर दवाखाना व आरोग्य केंद्रामार्फत स्थानिक नागरिकांना प्राथमिक आरोग्य सेवा पुरविण्यात येतात.

इमारतीमध्ये लिफ्ट कार्यरत असून इमारतीच्या पायऱ्या सुस्थितीत असल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेने कळविले आहे.

---

## सोलापूर जिल्हयात कर्नाटक राज्यातून गुटखा विक्री करणाऱ्यांवर कारवाई करण्याबाबत

**(१७) ४१६९५ (२०-०६-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **अन्न व औषध प्रशासन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) बालाजीनगर (ता.मंगळवेढा, जि.सोलापूर) हद्दीत कर्नाटकातून येणाऱ्या ओमनी वाहनातून २ लाख ५ हजार ६२० रुपयांचा गुटखा दिनांक १४ एप्रिल, २०१८ रोजी वा त्यासुमारास पकडण्यात आला, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यात गुटखा बंदी असतानाही कर्नाटक भागातून राज्यातील सीमालगतच्या जिल्ह्यातून अवैधरित्या गुटख्याची तस्करी करून सोलापूर जिल्ह्यात गुटखा विक्रीसाठी आणला जात असल्याने राज्यात गुटखा विक्री केली जात आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्नुसार राज्यात गुटखा विक्री होत असल्याने या व्यसनाने तरुण पिढी कॅन्सरसारख्या आजाराला बळी पडत असल्याने या पिढीला वाचविण्यासाठी अवैध गुटखा निर्मिती व तस्करी करणाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (०७-०७-२०१८) :** (१) बालाजीनगर (ता.मंगळवेढा, जि.सोलापूर) हद्दीत कर्नाटकातून येणाऱ्या ओमनी वाहनातून २ लाख ५ हजार ६२० रुपयांचा प्रतिबंधित अन्न पदार्थ पानमसाला व सुगंधित तंबाखुचा साठा दिनांक १४ एप्रिल, २०१८ रोजी पकडण्यात आला आहे. सदर साठ्यामध्ये गुटख्याचा समावेश नाही.

(२) राज्यात छुप्या व चोरट्या पध्दतीने इतर राज्यातून गुटखा आणून त्याची विक्री केल्याची प्रकरणे अन्न व औषध प्रशासनाच्या निदर्शनास आली आहेत.

(३) उपरोक्त प्रकरणी प्रतिबंधित अन्न पदार्थाच्या वाहतुकीसाठी वापरण्यात आलेले ओमनी वाहन जप्त करण्यात आले आहे. जप्त साठ्यातुन ०८ अनौपचारीक नमुने विश्लेषणासाठी घेण्यात आले आहेत. सदर नमुन्यांचे अहवाल अद्याप प्रलंबित आहेत

अन्न व औषध प्रशासनाने संपूर्ण राज्यात सन २०१७-१८ मध्ये ४६३५ अन्न आस्थापनांची तपासणी करुन १३९६ पेढ्यांवर प्रतिबंधित अन्न पदार्थाबाबत कारवाई करुन एकूण रुपये ३९,८४,००,७६५/- किंमतीचा साठा जप्त करण्यात आला आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई शहर तसेच उपनगरात पावसाळयात सखल भागात जमा होणाऱ्या पाण्याचा निचरा करण्यासाठी पंप लावण्याच्या कामाकरीता कंत्राटदाराला देण्यात आल्याबाबत

**(१८) ४१८७३ (२१-०६-२०१८). ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई शहर तसेच उपनगरात पावसाळयात सखल भागात जमा होणाऱ्या पाण्याचा निचरा करण्यासाठी ठिकठिकाणी पंप लावण्याच्या कामाकरीता मुंबई महानगरपालिकेने नियुक्त केलेल्या कंत्राटदाराला रुपये ५५ कोटी देण्यात आल्याचे माहे एप्रिल, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, गत पावसाळयात सदरहू पंपाकरीता रुपये २३ कोटी खर्च केले असून सन २०१७ मध्ये पंपाची संख्या कमी केली असतानाही रुपये ५५ कोटी कंत्राटदाराने आकारल्याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीअंती काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१४-०७-२०१८) :** (१) मुंबई शहर तसेच उपनगरात पावसाळ्यात सखल भागात जमा होणाऱ्या पाण्याचा निचरा करण्यासाठी २७९ ठिकाणी पंप, सन २०१८ व २०१९ या दोन वर्षासाठी भाडेतत्वावर लावण्याच्या कामाकरीता बृहन्मुंबई महानगरपालिकेने एकूण रुपये ५४.०८ कोटीच्या कंत्राटाचे कार्यादेश माहे एप्रिल, २०१८ दिलेले आहे.

(२) सन २०१६ व २०१७ या दोन वर्षासाठी २७२ ठिकाणी पंप लावण्याकरीता रुपये २८.८५ कोटी एवढ्या खर्चाचे कंत्राट देण्यात आले होते.

किमान वेतनाच्या दरात कामगार विभागाच्या दिनांक ०५ ऑगस्ट, २०१७ च्या निर्णयानुसार झालेली वाढ गृहीत धरुन बाजार भावानुसार अंदाजपत्रक तयार करण्यात आले.

सदर कामाची देयके अद्यापपर्यंत अदा करण्यात आली नसल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील अकरावी पासून सुरु होणारे किमान कौशल्याधारित अभ्यासक्रम रद्द करण्याबाबत

**(१९) ४२०१४ (१४-०६-२०१८). श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अकरावी पासून सुरु होणारे किमान कौशल्याधारित अभ्यासक्रम येत्या शैक्षणिक वर्षापासून बंद करण्यात येणार असल्याचे माहे मे, २०१८ च्या दुसऱ्या सप्ताहात निदर्शनास आले असून सदर अभ्यासक्रम बंद करण्याची कारणे काय आहेत,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले तद्नुसार अभ्यासक्रम बंद करु नये याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (३०-०६-२०१८) :** (१) उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम (किमान कौशल्यावर आधारित अभ्यासक्रम) बंद करण्यात आलेले नाहीत.

(२) व (३) उच्च माध्यमिक व्यवसाय (एचएससी व्होकेशनल) अभ्यासकम पूर्ण करणाऱ्या विद्यार्थ्यांना राष्ट्रीय व्यवसाय प्रमाणपत्र (NTC) किंवा राष्ट्रीय व्यवसाय प्रशिक्षण परिषदेचे प्रमाणपत्र (NCVT) मिळत नाहीत. त्यामुळे उच्च माध्यमिक व्यवसाय (एचएससी व्होकेशनल) अभ्यासक्रम पूर्ण करणाऱ्या विद्यार्थ्यांना उच्च माध्यमिक बरोबर राष्ट्रीय व्यवसाय प्रमाणपत्र (NTC) किंवा राष्ट्रीय व्यवसाय प्रशिक्षण परिषदेचे प्रमाणपत्र (NCVT) देता यावे या दृष्टिकोनातून सदर अभ्यासक्रमाचे उन्नतीकरण करुन त्यांचे औद्योगिक प्रशिक्षण संस्था (ITI) किंवा व्यवसाय प्रशिक्षण संस्था (VTI) मध्ये रुपांतरण करणेचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

---

## राज्यात मध्यवर्ती कारागृहात शिक्षा भोगणाऱ्या कैद्यांची सुनावणी होत नसल्याबाबत

**(२०) ४२०३६ (०८-०६-२०१८). डॉ.परिणय फुके, श्री.हेमंत टकले, श्री.धनंजय मुंडे, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.रामराव वडकुते, श्री.ख्वाजा बेग, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड, श्री.शरद रणपिसे, ॲड.हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील येरवडा (पुणे) मुंबई, नाशिक, नागपूर, औरंगाबाद व अमरावती येथील मध्यवर्ती कारागृहात शिक्षा भोगत असलेल्या कैदयापैकी ७३ टक्के कैद्याच्या जामिनावर सुनावणी होत नसल्याने गत अनेक वर्षापासून ते तुरुंगात खितपत पडले असल्याचे अलिकडेच केलेल्या पहाणीत निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यापैकी बहुतेक कैदी हे किरकोळ स्वरुपाच्या गुन्हयात संशयित असून त्यांना न्यायालयात हजर करण्यासाठी पोलिसांकडे पुरेसे मनुष्यबळ उपलब्ध नसून सण, राष्ट्रीय कार्यक्रमासाठी बंदोबस्त आणि अतिमहत्वाच्या व्यक्तींच्या सुरक्षेसाठी उपलब्ध पोलीस दलातून पोलीस दिले जात असल्याने विहित केलेल्या तारखेच्या दिवशी कैद्यांना न्यायालयात नेणे शक्य होत नसून कच्चा कैद्यांची जामिनावर सुनावणी खेरीज तुरुंगातून सुटका होत नसल्याने त्याची मानसिक कुचंबणा होत असल्याचे आढळून आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुषंगाने कोणती कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०३-०७-२०१८) :** (१) हे अंशत: खरे आहे.

(२) येरवडा (पुणे), मुंबई, नाशिक, नागपूर, औरंगाबाद व अमरावती या कारागृहांत मागणीप्रमाणे १०० टक्के पोलीस पथकाचा पुरवठा पोलीस मुख्यालयाकडून होत नाही, ही वस्तुस्थिती आहे. परंतु, न्यायालयात हजर

राहण्याची आवश्यकता नसलेल्या जास्तीत जास्त बंद्यांना व्हिडिओ कॉन्फरन्सिंग (व्ही.सी.) द्वारे मा.न्यायालयात हजर करण्यात महाराष्ट्र राज्याचा देशात प्रथम क्रमांक आहे. तसेच जामीनावर सुनावणीसाठी न्यायालयात बंद्यांना प्रत्यक्ष हजर करणे आवश्यक नाही.

(३) मा.उच्च न्यायालय, जनहित याचिका क्र.४६/२०१५ व १६७/२०१५ सह ९/२०१७ मध्ये दिनांक ०१/०३/२०१७ च्या आदेशानुसार राज्यातील कारागृहात क्षमतेपेक्षा जास्त बंदी असल्याने कायद्यात्मक तरतूदी व मा.सर्वोच्च न्यायालयाचे या संदर्भातील विविध न्यायालयीन निवाड्यांच्या अनुषंगाने अभ्यास करुन न्यायाधीन बंद्यांची संख्या कमी करण्याच्या दृष्टीने उपाययोजना सुचविण्यासाठी मा.उच्च न्यायालयाचे सेवानिवृत्त न्यायाधीश डॉ. एस. राधाकृष्णन यांच्या अध्यक्षतेखाली शासन निर्णय दिनांक ०६/०६/२०१७ अन्वये समिती गठित केली आहे. सदर समितीने नुकताच अहवाल गृह विभागास सादर केला असून, त्याची तपासणी करण्यात येत आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबई महानगरपालिकेच्या चेंबूर येथील दिवालीबेन मोहनलाल मेहता (माँ) रुग्णालयात डॉक्टर व कर्मचाऱ्यांची पदे रिक्त असून इतर पायाभूत सुविधांचा अभाव असल्याबाबत

**(२१) ४२०९३ (०८-०६-२०१८). श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.नागोराव गाणार, श्री.रामनिवास सिंह, श्रीमती स्मिता वाघ, श्री.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईमधील चेंबूर येथील दिवालीबेन मोहनलाल मेहता (माँ) रुग्णालयात डॉक्टर व कर्मचाऱ्यांची रिक्त पदे, अपुरी यंत्रसामुग्री आणि पायाभूत सुविधांची कमतरता असल्याने रुग्णांची गैरसोय होत असल्याचे दिनांक १४ एप्रिल, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर रुग्णालयातील क्ष-किरण विभाग बंद असून एमआरआय मशीन आणि सिटी स्कॅन लॅब नसल्याने रुग्णांना खाजगी रुग्णालयात जावे लागत आहे तसेच रुग्णालयात बरीच औषधे उपलब्ध नसल्यामुळे डॉक्टरांनी लिहून दिलेल्या औषधांपैकी काही औषधे बाहेरून घ्यावी लागत असल्याचेही निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त परिसरात मुंबई महानगरपालिकेचे माँ हे एकमेव शासकीय रुग्णालय असल्यामुळे सदर रुग्णालयात चेंबुर, गोंवडी तसेच आसपासचे नागरिक उपचारासाठी येत असल्याने अनेकदा येथील गर्दी व मोठ्या रांगा पाहून रुग्ण खाजगी रुग्णालयांमध्ये जात असल्याने त्यांना आर्थिक भुर्दंड सहन करावे लागत असल्याचेही निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, सदर रुग्णालयातील कर्मचाऱ्याची रिक्त पदे भरून अद्यावत सोयी सुविधा पुरविण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही वा उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१२-०७-२०१८) :** (१) दिवालीबेन मोहनलाल मेहता (माँ) या बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या ७४ रुग्णशय्येच्या रुग्णालयात खालील रुग्णसेवा उपलब्ध आहेत :-

- २४ तास बाह्य / आंतररुग्ण सेवा
- वैद्यकीय चिकित्सा
- शल्य चिकित्सा
- स्त्रीरोग व बालरोग चिकित्सा
- कान, नाक, घसा व नेत्र विभाग
- त्वचारोग चिकित्सा
- क्षयरोग विभाग
- हृदय स्पंदन आलेख सुविधा
- क्ष-किरण विभाग, प्रयोगशाळा
- २४ तास रुग्णवाहिका

त्यामुळे अपुरी यंत्रसामुग्री आणि पायाभूत सुविधांच्या कमतरतेमुळे रुग्णांची गैरसोय होत नसल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेने कळविले आहे.

(२) सदर रुग्णालयामध्ये क्ष-किरण विभाग कार्यरत आहे. रुग्णांना सी.टी.स्कॅन, एम.आर.आय. या सुविधांची आवश्यकता भासल्यास त्यांना राजावाडी रुग्णालय व पंडीत मदनमोहन मालवीय रुग्णालय या रुग्णालयांकडे चाचणींकरीता पाठविण्यात येते.

महानगरपालिकेच्या अनुसूचीवरील सर्व औषधे माँ रुग्णालयात पुरेशा प्रमाणात उपलब्ध आहेत.

(३) माँ रुग्णालयातील आपात्कालीन विभाग २४ तास कार्यरत असून वैद्यकीय, शल्यचिकित्सा, बालरोग, त्वचारोड व क्षयरोग बाह्यरुग्ण विभाग सकाळी ८ ते दुपारी १२ तसेच कान, नाक, घसा, स्त्रीरोग व मधुमेह बाह्यरुग्ण विभाग दुपारी १ ते ३ या वेळेत सुरु असल्यामुळे गर्दीचे नियोजन योग्यरित्या होत असल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेने कळविले आहे.

(४) रुग्णालयाच्या आस्थापनेवर १७५ डॉक्टरस् व कर्मचारी असून रिक्त असलेली ३२ पदे भरण्याची कार्यवाही बृहन्मुंबई महानगरपालिकेकडून करण्यात येत आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबई उपनगरातील मानखुर्द, भांडूप व घाटकोपर येथील झोपडपट्टीत शौचालय कोसळून अपघात झाल्याबाबत

**(२२) ४२०९९ (०८-०६-२०१८). श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.रामनिवास सिंह, श्रीमती स्मिता वाघ, श्री.प्रविण दरेकर, श्री.हेमंत टकले, श्री.धनंजय मुंडे, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.रामराव वडकुते, श्री.ख्वाजा बेग, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील भांडूप पिंपळेश्वर कॉलनीमधील साई सदन चाळीतील सार्वजनिक शौचालय खचल्याने दोघांचा मृत्यू झाल्याचे माहे एप्रिल, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, म्हाडा व मुंबई महापालिकेमार्फत सन १९८० पासून बांधलेल्या शौचालयांपैकी ८० हजार शौचालये देखभाल व दुरुस्तीच्या अभावामुळे तसेच वाढत्या लोकसंख्येमुळे जीर्ण होऊन धोकादायक झाली असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर जीर्ण झालेल्या शौचालयाचे लेखापरीक्षण करून धोकादायक आढळलेल्या शौचालयांची स्वच्छ भारत अभियानांतर्गत दुरुस्ती किंवा सदर शौचालय नविन बांधण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही किंवा उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०६-०७-२०१८) :** (१) साई सदन चाळ, पिंपळेश्वर कॉलनी, भांडूप येथील खाजगी शौचालय दिनांक २८/०४/२०१८ रोजी कोसळल्याने दोन व्यक्तींचा मृत्यू झाला ही वस्तुस्थिती आहे.
(२) व (३) म्हाडामार्फत बांधण्यात आलेल्या सार्वजनिक शौचालयांच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे सूचना देण्यात आल्या आहेत

- सुस्थितीत असलेल्या शौचालयांची संयुक्त पाहणी करुन सदर शौचालये महानगरपालिकेकडे हस्तांतरीत करण्यात यावीत.
- सदर शौचालयांमध्ये पाणी व वीज पुरवठा बृहन्मुंबई महानगरपालिकेने उपलब्ध करुन द्यावा व सदर शौचालयांची देखभाल स्वयंसेवी संस्था (सी.बी.ओ.) मार्फत करुन घेण्यात यावी.
- दुरुस्तीची आवश्यकता असणारी शौचालये म्हाडा प्रशासनाने स्वनिधीतून दुरुस्त करुन महानगरपालिकेकडे हस्तांतरीत करावीत. तद्नंतर महानगरपालिकेने सदर शौचालयांची देखभाल स्वयंसेवी संस्था (सी.बी.ओ.) मार्फत करुन घेण्यात यावी.

बृहन्मुंबई महानगरपालिकेकडून बांधण्यात आलेल्या शौचालयांच्या दुरुस्तीसाठी खालीलप्रमाणे उपाययोजना करण्यात येत आहेत :-

- महानगरपालिकेच्या विभाग कार्यालयांमार्फत परिरक्षण व दुरुस्ती करण्यात येते.
- जीर्ण झालेल्या शौचालयांची वेळोवेळी पुनर्बांधणी करण्यात येते.

- सन २०१७-१८ पासून शौचालयांच्या संरचनात्मक परिरक्षणासाठी विभाग कार्यालयांना निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.
- बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत १६,७०३ शौचकुपांची पुनर्बांधणी व ६,०७१ शौचकुपांची नव्याने बांधणी करण्यासाठी निविदा प्रक्रियेची कार्यवाही सुरु आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई पालिकेच्या विविध विभागांना लागणाऱ्या वस्तूंची खरेदी बाजारभावापेक्षा जास्त दराने करण्यात आल्याबाबत

**(२३) ४२१८५ (०८-०६-२०१८). आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.प्रसाद लाड :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई पालिकेच्या विविध विभागांना लागणारे फलक, लाकडाचे लहान डायनिंग टेबल, हात असलेल्या आणि नसलेल्या प्लास्टिकच्या खुर्चा, टेबल, विद्यार्थ्याकरीता लेखनासाठी फळी असलेली खुर्ची, पादत्राणे-बूट ठेवण्याची फडताळे इत्यादी खरेदी करण्याचा निर्णय पालिकेने घेतला आहे, हे खरे आहे काय

(२) असल्यास, सदर वस्तूंच्या खरेदीसाठी पालिकेच्या मध्यवर्ती खरेदी खात्याने अंदाजित केलेले दर हे बाजारभावापेक्षा दुप्पट असल्याची बाब दिनांक ४ एप्रिल, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आली असूनही सदर वस्तूंची खरेदी कंत्राट मध्यवर्ती खात्याने संबंधित कंत्राटदारांना देण्याचा निर्णय घेतला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार संबंधितावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१६-०७-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) व (३) अशा आशयाचे वृत्त दिनांक ०६/०४/२०१८ रोजीच्या वृत्तपत्रामध्ये प्रसिध्द झाले होते. याबाबतची वस्तुस्थित पुढीलप्रमाणे :-

बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत ब्लॅक बोर्ड, नोटीस बोर्ड, प्लास्टिक चेअर्स इत्यादी १० बाबींसाठी ई-निविदा प्रक्रियेद्वारे दिनांक २८/०८/२०१७ रोजी निविदा मागविण्यात आली.

निविदा प्रक्रियेचे अंदाजपत्रक हे महानगरपालिकेच्या अस्तित्वात असलेल्या दर परिपत्रकाप्रमाणे निश्चित केले जातात. यानुसार सदरील १० बाबींपैकी प्लास्टिक चेअर विथ आर्म्स व स्टूडंट चेअरर्स विथ राईटिंग पॅड या दोन बाबींकरीता विद्यमान दर परिपत्रक उपलब्ध असल्याने त्या बाबींचे दरपरिपत्रकातील दर जसे च्या तसे अंदाजित दरांसाठी विचारात घेतलेले आहेत.

ब्लॅक बोर्ड, नोटीस बोर्ड व डायनिंग चेअर्स या तीन बाबींचे दर विद्यमान दर पत्रकामध्ये नमूद नसल्याने, तथापि ह्या बाबींचे दर सन २०१४ ते २०१६ च्या दर परिपत्रकामध्ये उपलब्ध असल्याकारणाने त्याकरीता सदर बाबींच्या दरावर प्रतिवर्षी १०% वाढ गृहित धरुन त्यांची सरासरी काढून अंदाजित दर निश्चित करण्यात आले.

डायनिग टेबल स्मॉल वुडन, प्लास्टिक चेअर विदाऊट आर्म्स, प्लास्टिक स्टुल व आईस बॉक्स या चार बाबींचे दर विद्यमान तसेच मागील दर परिपत्रकात उपलब्ध नसल्याने त्या बाबींकरीता बाजार सर्व्हेक्षण करून अंदाजित दर निश्चित करण्यात आले आहेत.

शू रॅक या बाबींसाठी यापूर्वी माहे मे, २०१७ मध्ये मागविण्यात आलेल्या तथापि, जीएसटी शुल्क निर्धारीत झाले नसल्याने रद्द झालेल्या निविदेतील लघुत्तम प्राप्त दर अंदाजित दरासाठी विचारात घेतलेले आहेत.

सदर वस्तूंची खरेदी ही बाजारभावापेक्षा दुप्पट दराने असल्याची बाब वस्तुस्थितीत अनुसरुन नसून प्रत्यक्षात वस्तुचे निविदेत प्राप्त दर हे निविदा अंदाजित दरापेक्षा कमी आहे, ज्या वस्तुंचे निविदा प्राप्त दर अंदाजित दरापेक्षा जास्त आहेत ते वाटाघाटी अंती कमी करण्यात आले आहेत. तसेच आईस बॉक्स या बाबींचे दर अंदाजित दरापेक्षा जास्त असल्याने सदर बाब निविदेतून वगळण्यात आली आहे.

सदर प्रकरणी मध्यवर्ती खरेदी खात्यामार्फत ई-निविदा प्रक्रियेद्वारे लघुत्तम देकार असणाऱ्या पुरवठादारांशी वाटाघाटीअंती प्राप्त झालेल्या दरास स्थायी समितीची दिनांक ०७/०४/२०१८ रोजी मान्यता प्राप्त झाली आहे. तद्नंतर दिनांक ०९/०५/२०१८ रोजी दर परिपत्रक निर्गमित करण्यात आले आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## खाजगी अनुदानित शाळांना गणित भाषा शैक्षणिक साहित्य पेटी व इतर साहित्य देण्याबाबत

**(२४) ४२३७१ (१४-०६-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शासनातर्फे अनेक प्रकारचे ट्रेनिंग अनुदानित शाळांमधून देण्यात येते परंतु त्यासाठी लागणारे गणित भाषा शैक्षणिक पेटी व इतर साहित्य देण्यात येत नसून जिल्हा परिषदेतील शाळांना सदरहू साहित्य देण्यात येते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, नागपूर विभागाच्या शिक्षक लोकप्रतिनिधींनी दिनांक १६ मे, २०१८ रोजी शासनास निवेदन पाठवून उक्त प्रकरणी दखल घेण्याची विनंती केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन खाजगी अनुदानित शाळांना सुध्दा गणित भाषा शैक्षणिक पेटी व इतर साहित्य मंजूर करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२९-०६-२०१८) :** (१) व (२) हे खरे आहे.
(३) व (४) सर्व शिक्षा अभियान अंतर्गत अध्ययन समृध्दी कार्यक्रमाकरीता मंजूर असणारी तरतूद ही शासकीय व स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळांमधील विद्यार्थ्यांकरीता विनियोगात आणणे अनिवार्य आहे. त्यामुळे गणित भाषा शैक्षणिक पेटी व इतर साहित्य सर्व शिक्षा अभियान अंतर्गत खाजगी अनुदानित शाळांना उपलब्ध करुन देणे शक्य नाही.

---

## महात्मा फुले मागासवर्गीय उच्च प्राथमिक शाळा, गुलशननगर (नागपूर) शाळेची चौकशी करण्याबाबत

**(२५) ४२३७३ (१४-०६-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, डॉ.परिणय फुके : तारांकित प्रश्न क्रमांक ३८११४ ला दिनांक २३ मार्च, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महात्मा फुले मागासवर्गीय उच्च प्राथमिक शाळा, गुलशननगर (नागपूर) या शाळेतील खोटी पटसंख्या, नियमबाह्य मान्यता, स्थलांतरास दिलेले संरक्षण मा.उच्च न्यायालयात केलेले शपथपत्र इत्यादी बाबींची चौकशी करून त्याबाबतचा अहवाल सादर करण्यात आला आहे काय,

(२) तसेच शासनाने केलेल्या अपहाराविरूध्द कारवाई करण्याचे आदेश देण्याबाबत विदर्भ माध्यमिक शिक्षक संघाने दिनांक ८ डिसेंबर, २०१७ रोजी व दिनांक १६ मे, २०१८ रोजी वा त्यासुमारास नागपूर जिल्ह्याचे मा.पालकमंत्री यांना निवेदन देवून चौकशीची मागणी केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर शाळेच्या स्थलांतराच्या आदेशांची सत्यता पडताळणी करून मिळणेबाबत शिक्षण उपसंचालक, नागपूर यांच्याकडून कार्यवाही पूर्ण होवून त्याबाबतचा अंतिम निर्णय झाला आहे काय, असल्यास निर्णयाचे स्वरुप व त्याचा थोडक्यात तपशिल काय आहे,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर प्रकरणी गैरव्यवहार करणाऱ्या संबंधितांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (३०-०६-२०१८) :** (१) अद्याप शासनास अहवाल प्राप्त झालेला नाही.

(२) या बाबतचे निवेदन प्राप्त झाले आहे.

(३) सदर प्रकरणी अंतिम निर्णय झालेला नाही.

(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मोहेगाव (ता.नांदगाव, जि.नाशिक) येथील शाळेतील मुख्याध्यापकाने शाळाबाह्य कामामुळे आत्महत्या केल्याबाबत

**(२६) ४२३७४ (१५-०६-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मोहेगाव (ता.नांदगाव, जि.नाशिक) येथील शाळेतील कार्यरत मुख्याध्यापक श्री.मुकुंद मनोहरदास शोभावत यांनी शाळाबाह्य कामामुळे मानसिक संतुलन बिघडल्याने दिनांक २६ एप्रिल, २०१८ रोजी आत्महत्या केली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, श्री.शोभावत हे सध्या चांदवड तालुक्यातील मेसनखेड (खुर्द) येथील जिल्हा परिषद शाळेत श्रेणी पात्र मुख्याध्यापक म्हणुन नियुक्त झाल्यानंतर सरल प्रणालीच्या कामांचा त्रास सहन न झाल्यामुळे मानसिक त्रासाखाली येऊन त्यांनी आत्महत्या केली, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या प्रकरणाबाबत नागपूर विभागाच्या शिक्षक लोकप्रतिनिधींनी शासनास दिनांक १६ मे, २०१८ रोजी निवेदन पाठवून या प्रकरणाची चौकशी करण्याची तसेच शिक्षकांना शाळाबाह्य कामातुन रिक्त करण्याची मागणी केली, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०२-०७-२०१८) :** (१) अंशतः खरे आहे.

(२) हे खरे नाही.

(३) हे खरे आहे.

(४) व (५) याबाबत केलेल्या चौकशीत श्री.शोभावत यांनी प्रशासकीय तणावामुळे आत्महत्या केलेली नसल्याचे आढळून आले.

---

## बाल हक्क अभियान व क्राय या स्वयंसेवी संस्थेने केलेल्या सर्वेक्षणातील शाळांना पायाभूत सुविधा व शिक्षक उपलब्ध करुन देण्याबाबत

**(२७) ४२३८४ (१९-०६-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास : तारांकित प्रश्न क्रमांक २८२७६ ला दिनांक २० मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील ८ जिल्ह्यातील १२२ जिल्हा परिषदेच्या शाळांचे सर्वेक्षण क्रायच्या बाल हक्क अभियानाने केले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त सर्वेक्षणातून क्रायने तयार केलेल्या अहवालानुसार राज्यात अद्याप १३ टक्के शाळांच्या इमारती कमजोर आणि मुलांसाठी धोकादायक असून ५७ टक्के शाळांमध्ये पूर्णवेळ मुख्याध्यापक नसल्याची तसेच २९ टक्के शाळांना संरक्षण भिंत नसल्याची, ६९ शाळांमध्ये शौचालय असले तरी सफाई कर्मचारी नसल्याचे, ३४ टक्के शाळांमध्ये खेळाचे मैदान नसल्याचे, ६३ टक्के शाळांमध्ये पिण्याचे शुद्ध पाणी नसल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(३) असल्यास, राज्यातील शासकीय व अनुदानित शाळांमध्ये शासनाच्या १० निर्देशकांची प्रभावी अंमलबजावणी होत नसल्याने शासकीय शाळांमध्ये मुले कमी दाखवून शाळा बंद केल्या जात असल्याचे दिसून येत आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०६-०७-२०१८) :** (१) क्राय (CRY) व बालहक्क अभियान यांनी ८ जिल्ह्यातील १२२ शाळांचे सर्वेक्षण केले आहे.

(२) अंशत: खरे आहे.

(३) हे खरे नाही.

(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## केंद्र शासनाच्या निधी अभावी राज्यातील शासकीय शाळांच्या सोयी सुविधांवर परिणाम होत असल्याबाबत

**(२८) ४२३८५ (१९-०६-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासनाच्या महाराष्ट्र राज्य प्राथमिक शिक्षण परिषदेने सर्व शिक्षा अभियानासाठी सन २०१६-१७ मध्ये रुपये २२९६ कोटी ३३ लाख आणि २०१७-१८ मध्ये २४५५ कोटी ४० लाख रुपयांची मागणी केंद्र शासनाकडे केली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, वरीलप्रमाणे केलेल्या मागणीनुसार केंद्र शासनाने या निधीत कपात करुन सन २०१६-१७ मध्ये केवळ रुपये ६०८ कोटी ३३ लाख आणि सन २०१७-१८ मध्ये फक्त रुपये ४६१ कोटी १ लाख एवढी अत्यल्प रक्कम राज्य शासनास दिली, हे खरे आहे काय,

(३) असल्यास, केंद्र शासनाने सर्व शिक्षा अभियानाच्या निधीमध्ये केलेल्या कपातीमुळे राज्यातील शासकीय शाळांच्या सोयी सुविधांवर परिणाम होण्याची शक्यता आहे, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२९-०६-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) हे खरे नाही.

(३), (४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## माध्यमिक शाळेतील शिक्षण सेवक व शिक्षकांच्या वैयक्तिक मान्यता प्रदान करण्याबाबत

**(२९) ४२३८७ (१४-०६-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ग्राम दर्शन विद्यालय खडसंगी (ता.चिमूर, जि.चंद्रपूर) या शाळेतील अ) श्री.संजय सूर्यभान गिरडे (खुला प्रवर्ग), ब) श्री.गजानन शालिकजी मडावी (अनुसूचित प्रवर्ग) या शिक्षण सेवकांच्या नियुक्तीस उपसचिव, शालेय शिक्षण विभाग यांनी दिनांक ३१ जानेवारी, २०१७ रोजीच्या पत्रानुसार आपल्या अधिकारात वैयक्तिक मान्यता प्रदान केली व आदेशाची प्रत शिक्षणाधिकारी (माध्य.) जि.प. चंद्रपूर यांना पाठविली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपसचिवांनी दिलेली मान्यता शिक्षणाधिकारी (माध्य.), जि.प. चंद्रपूर यांनी दिनांक १० एप्रिल, २०१७ च्या पत्र क्र. ६७८ नुसार नाकारली परंतु पुन्हा अवर सचिव, शालेय शिक्षण विभाग यांनी वरील शाळेतील शिक्षकांच्या वैयक्तिक मान्यता प्रदान करण्याची कार्यवाही करण्यात यावी असे आदेश दिनांक ०४ डिसेंबर, २०१७ रोजीच्या पत्रानुसार शिक्षणाधिकारी (माध्य.), जि.प. चंद्रपूर यांना दिले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, माध्यमिक शाळेतील शिक्षण सेवक व शिक्षकांच्या वैयक्तिक मान्यता देण्याचे अधिकार हे उपसचिवांना आहेत की शिक्षणाधिकाऱ्यांना याबाबत निर्माण झालेला गोंधळ याबाबत स्पष्ट खुलासा करून शासन तसे परिपत्रक निर्गमित करणार आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२८-०६-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) हे खरे आहे.

(३) व (४) विविध न्यायालयीन प्रकरणी मा.उच्च न्यायालयांनी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगिक वैयक्तिक मान्यता देताना शिक्षणाधिकारी यांनी तपासावयाच्या बाबींबाबत शासनाने वेळोवेळी शासन निर्णय निर्गमित केले आहेत.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुणे येथील कात्रज-कोंढवा या रस्त्यांचे भूसंपादन झालेले नसताना १७८ कोटीची निविदा प्रक्रियेला महापालिकेने मान्यता दिल्याबाबत

**(३०) ४२४३३ (२८-०६-२०१८). श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पुणे येथील कात्रज-कोंढवा या रस्त्याच्या भूसंपादनाची प्रक्रिया पूर्ण झालेली नसतानाही १७८ कोटीची निविदा प्रक्रियेला महापालिकेने मान्यता दिली असल्याची बाब माहे एप्रिल, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार सदर रस्त्याच्या निविदेस मान्यता देणाऱ्या पालिका अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-०७-२०१८) :** (१), (२) व (३) कात्रज कोंढवा रस्त्यासाठी रुपये २१५.४३ कोटी प्रकल्प खर्चाच्या दायीत्वास मान्यता देण्यात आल्यानंतर पुणे महानगरपालिकामार्फत दिनांक २६ सप्टेंबर, २०१७ रोजी जाहिरात देऊन निविदा मागविण्यात आल्या होत्या. तथापि, सदर निविदा प्रक्रिया रद्द करण्यात आली आहे.

त्यानंतर पुणे महानगरपालिकेमार्फत या कामासाठी दिनांक २० जून, २०१८ रोजी पुन्हा जाहिरात देऊन निविदा मागविण्यात आल्या आहेत.

या रस्त्यासाठी आवश्यक असणाऱ्या जागेपैकी सुमारे ४०% टक्के जागा पुणे महानगरपालिकेच्या ताब्यात आहे.

उर्वरित जागेचा ताबा मिळण्याकरीता महानगरपालिकेमार्फत प्रयत्न सुरु आहेत.

तथापि, प्रस्तुत प्रकरणी चौकशी करण्याबाबत महानगरपालिकेला सूचना देण्यात आल्या आहे.

---

## पुणे महानगरपालिकेच्या रुग्णालयात अत्याधुनिक सुविधा उपलब्ध करुन तज्ञ डॉक्टरांच्या निवडीच्या प्रस्तावास मंजुरी न मिळाल्याबाबत

**(३१) ४२४४१ (२८-०६-२०१८). श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे महापालिकेच्या रुग्णालयात अत्याधुनिक सुविधा उपलब्ध करुन देणाऱ्या तज्ञ डॉक्टरांच्या निवडीच्या प्रस्तावास गत पाच महिन्यांपासून मंजुरी मिळाली नसल्याची बाब माहे मे, २०१८ च्या दुसऱ्या सप्ताहात निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार सदर प्रस्तावास मंजुरी मिळण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०५-०७-२०१८) :** (१) व (२) पुणे महानगरपालिका प्रशासनाकडील आरोग्य अधिकारी व वैद्यकीय अधिकारी अशी ११ पदे नामनिर्देशनाने भरण्याचे महानगरपालिकेकडून प्रस्तावित आहे.

याबाबत जाहिरात प्रसिध्द केल्यानंतर कागदपत्रांची छाननी व मुलाखती अंती पात्र ७ पदांची निवड्यादी व अतिरिक्त निवड यादीस मान्यतेबाबतचा प्रस्ताव पुणे महानगरपालिकेच्या महिला व बाल कल्याण समितीमार्फत मुख्य सभेच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता.

सदर प्रस्तावास महिला व बालकल्याण समितीची मान्यता मिळाली नाही ही वस्तुस्थिती आहे.

नियमित विहीत प्रक्रियेव्दारे निवड झालेल्या उमेदवारांना त्वरीत नियुक्ती आदेश देण्याबाबत पुणे महानगरपालिकेस सूचना देण्यात आल्या आहेत.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुण्यातील कोरेगांव पार्कमधील सिमेंट रस्ता खोदाईचे काम नियमबाह्यरित्या खाजगी मोबाईल कंपनीद्‌वारे करण्यात येत असल्याबाबत

**(३२) ४२४४६ (२१-०६-२०१८). श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुण्यातील कोरेगांव पार्कमधील लेन क्र. ७ येथे खाजगी मोबाईल कंपनीने सिमेंट रस्ता ऑप्टिकल फायबर केबलसाठी खोदण्याचे काम नियमबाह्यरित्या केल्याची बाब माहे एप्रिल, २०१८ च्या तिसऱ्या सप्ताहात निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्‌नूसार नियमबाह्यरित्या काम करणाऱ्या संबंधित कंपनी तसेच ठेकेदारांवर कारवाई करुन खोदाईमुळे झालेले नुकसान तसेच दंड वसूल करण्याबाबत व या पदपथाची पुन्हा दुरुस्ती करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१२-०७-२०१८) :** (१) व (२) पुण्यातील कोरेगांव पार्कमधील लेन क्र. ७ येथे खाजगी मोबाईल कंपनीस ऑप्टीकल फायबर केबल टाकण्यासाठी विहित शुल्क घेऊन महानगरपालिकेने माहे जानेवारी, २०१८ मध्ये परवानगी दिली होती.

सदर खोदाई माहे एप्रिल, २०१८ मध्ये करण्यात आली.

ऑप्टीकल केबल डक्ट टाकण्याचे काम पूर्ण झाले नंतर सदर रस्ता व पदपथ पूर्ववत करण्यात आल्याचे पुणे महानगरपालिकेने कळविले आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबई येथील सी.सी.टी.व्ही.फुटेज अस्पष्ट असल्यामुळे तपासात अडथळा निर्माण होत असल्याबाबत

**(३३) ४२४६१ (२१-०६-२०१८). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई येथील डॉ.दिपाली लहामटे यांचा दिनांक ३० मार्च, २०१८ रोजी वा त्यासुमारास कारच्या धडकेत जखमी होऊन उपचारा दरम्यान मृत्यू झाला असून घटनास्थळावरील सी.सी.टी.व्ही. फुटेज अस्पष्ट असल्यामुळे तपासात अडथळा निर्माण झाला होता, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मुंबई येथील अनेक सी.सी.टी.व्ही. कॅमेऱ्यांमधून सुस्पष्ट फुटेज उपलब्ध होत नसल्यामुळे अनेक गुन्ह्यांच्या तपासात अडचणी निर्माण होत असून सी.सी.टी.व्ही. निविदेतील अटी व शर्तीप्रमाणे तांत्रिक बाबींची व तांत्रिक मनुष्यबळाची पूर्तता संबंधित कंत्राटदाराने अद्‌याप केलेली नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त अनियमिततेबाबत कंत्राटदारावर जबाबदारी निश्चित करुन दंडात्मक कारवाई करण्याबाबत तसेच करारातील अन्य तरतुदी पूर्ण करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबास कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१०-०७-२०१८) :** (१) बृहन्मुंबई पोलीस आयुक्तालयाच्या कार्यक्षेत्रातील मरीन ड्राईव्ह पोलीस ठाणे हद्दीत दिनांक २४/०३/२०१८ रोजी एन.एस. रोड, कैवल्यधाम येथील सिग्नल झेब्रा क्रॉसिंग (उत्तर वाहिनी), मुंबई या ठिकाणी डॉ. दिपाली बुधाजी लहामटे या पादचारी महिला रस्ता ओलांडत असताना आरोपी महिला शिखा अंकुर झवेरी हिने तिच्या ताब्यातील होंडा सिटी कार, ही भरधाव वेगाने, हयगयीने व निष्काळजीपणे चालवुन डॉ. दिपाली

लहामटे यांना जोरदार धडक देवुन तीच्या डोक्यास गंभीर दुखापत करुन तीला कोणतीही वैद्यकीय मदत न देता तसेच पोलिसांना माहिती न देता घटनास्थळावरुन पळुन जात असताना प्रत्यक्षदर्शी फिर्यादी श्री.यझडी अस्पी ड्रायव्हर यांनी सदर मोटार कारचा पाठलाग करुन आरोपी महिलेस मफतलाल बाथसिग्नलजवळ पकडले. त्यानुसार फिर्यादी यांच्या तक्रारीवरुन संबंधित मरीन ड्राईव्ह पोलीस ठाणे येथे गु.नों.क्र. ६७/२०१८ कलम- २७९, ३३८ भांदवि सह कलम - १३४ (अ)(ब) मोटार वाहन कायदा अन्वये दिनांक २४/०३/२०१८ रोजी गुन्हा नोंद करण्यात आला. या अपघातात जखमी डॉ.दिपाली बुधाजी लहामटे यांचा दिनांक ३०/०३/२०१८ रोजी उपचारा दरम्यान मृत्यू झाल्याने गुन्हच्या कलमामध्ये कलम ३०४ (अ) भांदवि या कलमाची वाढ करण्यात आलेली आहे.

नमुद गुन्हयातील आरोपी महिला ही अपघातग्रस्त घटनास्थळावरुन पळुन जात असतांना प्रत्यक्षदर्शी फिर्यादी यांनी तीच्या मोटार कारचा पाठलाग करुन आरोपी महिलेस पकडले असल्याने सदरचा गुन्हा तात्काळ उघडकीस आला आहे.

(२) शासनाने एल. ॲण्ड टी. कंपनीमार्फत मुंबई शहरामध्ये बसविलेल्या सी.सी.टी.व्ही. कॅमेरांच्या तांत्रिक बाबींची व देखभाल, तांत्रिक मनुष्यबळाची पुर्तता योग्य प्रकारे करण्यात येत आहे. तसेच बसविण्यात आलेल्या सी.सी.टी.व्ही. कॅमेऱ्यांमुळे बृहन्मुंबईतील पोलीस ठाण्यांच्या हद्दीतील बऱ्याच प्रमाणात गुन्हांचा तपास उघडकीस होण्यास मदत झालेली आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पुणे शहरात बीआरटी प्रकल्पात योग्य नियोजन नसल्यामुळे प्रवाशांच्या सुरक्षिततेचा प्रश्न निर्माण झाल्याबाबत

**(३४) ४२५९८ (२१-०६-२०१८). श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे शहरात गत दहा वर्षांपासून सुरू असलेल्या बीआरटी प्रकल्पात योग्य नियोजन नसल्यामुळे मार्गामध्ये वाहतूक कोंडी,अपघात व प्रवाशांच्या

सुरक्षिततेचा प्रश्न निर्माण झाला असल्याची बाब माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार पुणे शहरातील बीआरटी प्रकल्पातील त्रुटी दूर करून नियोजनबद्धपणे हा प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१२-०७-२०१८) :** (१) व (२)

- पुणे शहरातील बीआरटी प्रकल्पाबाबत माहे, २०१८ मध्ये वृत्तपत्रात बातम्या प्रसिध्द झाल्या होत्या हे खरे आहे.
- तथापि, महानगरपालिकेमार्फत हा प्रकल्प नियोजनबध्दरित्या कार्यान्वित असल्याचे महानगरपालिकेने कळविले आहे.
- बीआरटीच्या पथदर्शी प्रकल्पातील अनुभव, त्रुटी याचा आढावा घेऊन नविन बीआरटी मार्गाची रचना व बांधणी महानगरपालिकेच्या मान्यतेने करण्यात येत आहे.
- अस्तीत्वातील बीआरटी मार्गाच्या देखभाल दुरूस्तीसाठी सुध्दा कालबध्द उपाययोजना करण्यात येत आहे.
- बीआरटी मार्गावरील सुरक्षितेच्या दृष्टीने वाहतूक वार्डन, रोड साईनेजेस, मार्गीकांचे सुलभीकरण, सिंक्रोनाईज सिग्नल व्यवस्था असे उपाय करण्यात येत आहेत.
- तसेच रोड सेफटी ऑडीट अहवालानुसार आवश्यक असणारी कामे बीआरटी मार्गावर करण्यात येतात असे महानगरपालिकेने कळविले आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुणे शहरातील चोरीच्या घटनेत वाढ झाल्याबाबत

**(३५) ४२६०२ (२१-०६-२०१८). श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे शहरात जुना कात्रज घाट भागात रात्रीचा प्रवास करताना श्री.दिलीप शिवराम भोसले व त्यांची पत्नी यांना चोरट्यांनी अडवून शस्त्राचा धाक दाखवून त्यांच्याकडील साडे सात तोळे सोने व रोकड चोरून नेल्याची बाब माहे मे, २०१८ च्या दुसऱ्या आठवड्यात निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तदनुसार सदर चोऱ्या रोखण्यासाठी कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१०-०७-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) सदर प्रकरणी फिर्यादीचे तक्रारीवरून ५ अनोळखी आरोपीविरूद्ध भारती विद्यापीठ पोलीस स्टेशन, पुणे शहर येथे गु.र.नं. २३९/२०१८ भादंवि कलम ३९५ प्रमाणे गुन्हा दाखल करण्यात आला असून गुन्हा तपासावर आहे.

तसेच चोऱ्या रोखण्यासाठी खालीलप्रमाणे कारवाई करण्यात आली आहे :-

१. कात्रज जुना घाट दरम्यान भिलारेवाडी व मांगडेवाडी ग्रामपंचायत यांच्याशी पत्रव्यवहार करून सीसीटीव्ही बसविण्यात आले आहे.
२. रोडवर लाईट बसविण्यासंदर्भात सार्वजनिक बांधकाम विभाग पुणे यांच्याशी ही पत्र व्यवहार करण्यात आला आहे.
३. कात्रज घाटात वेळोवेळी अचानकपणे नाकाबंदी लावण्यात येत आहे.
४. तपास पथकातील कर्मचारी व अधिकारी यांची साध्या वेषात पेट्रोलींग नेमण्यात आली आहे.
५. कोंबिंग ऑपरेशन राबविण्यात येत आहेत.
६. रात्रगस्ती दरम्यान रात्रौ १०.०० वा ते पहाटे ०५.०० पर्यंत पोलीस कर्मचारी यांना कात्रज जुना व नवीन बोगद्यापर्यंत रात्र गस्तीसाठी नेमण्यात आले आहे.

७. पोलीस ठाणेकडील पीटर, वन, व २ मोबाईल द्वारे रात्रौ १०.०० वा ते पहाटे ०५.०० वाजेपर्यंत विशेष पेट्रोलींग नेमण्यात आले आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात शेतकरी संपामध्ये सहभागी झालेल्या आंदोलक शेतकऱ्यांवर दाखल करण्यात आलेले गुन्हे मागे घेण्याबाबत

**(३६) ४२७२० (२१-०६-२०१८). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील ठाणे, अमरावती, सातारा, सोलापूर, धुळे, औरंगाबाद, बीड, उस्मानाबाद, नांदेड, अमरावती, अकोला, नाशिक, लातूर, नागपूर, पुणे, नाशिक, अहमदनगर, औरंगाबाद, गोंदिया, जळगांव, बुलढाणा या ग्रामीण व शहरी कार्यक्षेत्रात माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान झालेल्या शेतकरी संपामध्ये आंदोलक शेतकऱ्यांवर पोलिसांकडून गुन्हे दाखल करण्यात आले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त शेतकऱ्यांवर आंदोलनासाठी दाखल केलेले सर्व गुन्हे मागे घेण्यात यावेत अशा प्रकारची मागणी स्थानिक लोकप्रतिनिधींनी दिनांक १४ मे, २०१८ रोजी वा त्यासुमारास शासनाकडे केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर मागणीचा शासनाने विचार करुन शेतकऱ्यांवरील गुन्हे मागे घेण्याबाबतचा निर्णय घेतला आहे काय, उक्त निर्णयाच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१०-०७-२०१८) :** (१) हे खरे आहे.

राज्यातील सातारा, सोलापूर ग्रामीण, औरंगाबाद शहर, बीड, उस्मानाबाद, नांदेड, अमरावती शहर, अमरावती ग्रामीण, अकोला, नाशिक शहर, नाशिक ग्रामीण, लातूर, नागपूर ग्रामीण, पुणे शहर, पुणे ग्रामीण, जळगाव व बुलढाणा या ठिकाणी शेतकरी संपातील आंदोलक शेतकऱ्यांवर गुन्हे दाखल करण्यात आले आहेत.

(२) अशा शेतकऱ्यांवरील आंदोलनासाठी दाखल केलेले गुन्हे मागे घेण्यात यावे, अशा स्वरुपाचे निवेदन शासनास प्राप्त झाले आहे.
(३) लोकप्रतिनिधीकडून शासनाकडे प्राप्त झालेल्या निवेदनांवर अहवाल मागविण्यात आले आहेत. सदर अहवाल प्राप्त झाल्यावर त्यावर विधि व न्याय विभागाचे अभिप्राय घेऊन पुढील कार्यवाही करण्यात येईल.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात नविन शिक्षक नियुक्ती वरील बंदीबाबत

**(३७) ४२७२७ (१९-०६-२०१८). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास, डॉ.परिणय फुके :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात नविन शिक्षक नियुक्तीवरील बंदीविरुद्ध गोंदिया शिक्षण संस्थेने मा.उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठात रिट याचिका दाखल केली असून यावर मा.उच्च न्यायालयाने राज्य शासनाला नोटीस देवून उत्तर सादर करण्याचा आदेश दिल्याचे माहे एप्रिल, २०१८ च्या दुसऱ्या आठवड्यात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शिक्षकांची पदे, विद्यार्थी संख्या युजीसीच्या नियमानुसार ठरत असून दर्जेदार व गुणवत्तापूर्ण शिक्षण देणे शासनाचे कर्तव्य असल्याने वेतनावरील खर्च कमी करण्याचे शिक्षणाला लागू होत नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन नविन शिक्षक नियुक्तीसाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०९-०७-२०१८) :** (१) होय.
(२) व (३) वित्त विभागाच्या प्रचलित धोरणानुसार पदांच्या आढाव्यास अंतिम मंजूरी मिळेपर्यंत पद भरती करता येणार नाही. अशासकीय अनुदानित महाविद्यालयातील शिक्षण व शिक्षकेतर पदांच्या आढाव्यासह रिक्त असलेली

पदे भरण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कल्याण (जि.ठाणे) येथे सहापदरी दुर्गाडी पुल उभारण्याच्या प्रलंबित कामाबाबत

**(३८) ४२७७४ (२१-०६-२०१८). श्री.जगन्नाथ शिंदे : दिनांक २० जुलै, २०१८ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक १ मधील प्रश्न क्रमांक ३९६५२ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कल्याण (जि.ठाणे) येथील दुर्गाडी पूल वाहतुकीच्यादृष्टीने व वाढत्या वाहन संख्येमुळे अपुरा पडू लागल्याने त्याच्याच शेजारी एमएमआरडीएमार्फत नवीन सहापदरी पूल उभारण्याचे कामास माहे मे, २०१४ मध्ये वा त्यादरम्यान मंजुरी मिळून एमएमआरडीएने सदर काम दिनांक १० मार्च, २०१८ रोजीपर्यत पूर्ण करण्याचे निश्चित करुनही उक्त कामास सुरुवात झालेली नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, आजमितीस ४ वर्षाचा कालावधी उलटून गेल्यानंतरही सदर पुलाचे १० टक्के काम ही पूर्ण झालेले नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदरहू नवीन दुर्गाडी पुलाचे काम प्रलंबित असल्याची सर्वसाधारण कारणे काय, उक्त काम शीघ्रगतीने हाती घेऊन पूर्ण करण्याच्यादृष्टीने शासनाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०६-०७-२०१८) :** (१), (२), (३) व (४) कल्याण (जि.ठाणे) येथील दुर्गाडी पूलाच्या शेजारी नवीन सहापदरी पुलाच्या बांधकामास दिनांक ११ मार्च, २०१६ रोजीच्या कार्यादेशाद्वारे मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत सुरुवात करण्यात आलेली आहे. आजमितीस २०% काम मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत पूर्ण करण्यात आलेले आहे. तथापि,

महाराष्ट्र मेरी टाईम बोर्डाच्या दिनांक ०९/०५/२०१७ रोजीच्या सुधारीत ना-हरकत प्रमाणपत्रानुसार नौकावहन गाळयांची लांबी वाढवावी लागल्यामुळे प्रस्तावित पूलाच्या संरचनेमध्ये बदल करावा लागला व पुलाचे नकाशे नव्याने मंजूर करावे लागले. पर्यायाने काम पूर्णत्वास अतिरिक्त कालावधी लागणे अपेक्षित आहे.

---

## भिवंडी महानगरपालिकेने अंजूरफाटा ते बागे फिरदोस मशीद या रस्त्याची दुरवस्था झाल्याबाबत

**(३९) ४२७७७ (१८-०६-२०१८). श्री.जगन्नाथ शिंदे** : सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) भिवंडी महानगरपालिकेने १४ व्या वित्त आयोग निधीतून सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात ८ कोटी ९१ लाख रुपये खर्च करून तयार केलेला अंजूरफाटा ते बागे फिरदोस मशीद हा ८० फुट रुंद व साडेचार कि.मी. लांब रस्त्याची मुदतीपूर्वीच दुरवस्था झाल्याने नागरिकांच्या तक्रारीनुषंगाने तत्कालीन आयुक्तांनी शासनाच्या आय.आय.टी. संस्थेमार्फत तपासणीसाठी ठेकेदाराच्या अनामत रकमेतून आय.आय.टी. ला रुपये १६ लाख ४० हजार भरल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, आय.आय.टी. संस्थेमार्फत २ महिन्यांपूर्वीच रस्त्यांची तपासणी होवूनही उक्त तपासणीचा अहवाल भिवंडी महापालिकेला सादर करण्यात आलेला नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, महानगरपालिकेचे काही अधिकारी आणि संबंधित ठेकेदार यांच्याकडून आय.आय.टी.चा अहवाल गहाळ केल्याची शक्यता वर्तविली जात असून पालिका आयुक्तांनी रस्त्याच्या कामात लक्ष घालण्याची मागणी नागरीकांकडून करण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, आय.आय.टी. कडून सदरहू रस्त्याच्या कामाचा तपासणी अहवाल प्राप्त करून घेऊन संबंधित दोषी ठेकेदारावर कारवाई होण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची करणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०२-०७-२०१८) :** (१) होय.

भिवंडी निजामपुर शहर महानगरपालिकेने रस्त्याच्या गुणवत्तेविषयी प्राप्त तक्रारीची शहनिशा करण्याकरीता आय.आय.टी., मुंबई यांना विनंती केली होती.

आय.आय.टी., मुंबई संस्थेच्या तपासणी फी करीता रुपये २१,३९,००० अदा करण्यात आले असून उक्त रकमेचे समायोजन ठेकेदाराच्या अनामत व इसारा रकमेतून करण्यात आले आहे.

(२) व (३) भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेस आय.आय.टी., मुंबई संस्थेचा अहवाल दिनांक ०७/०५/२०१८ रोजी प्राप्त झाला आहे व सदर अहवाल भिवंडी-निजामपुर शहर महानगरपालिकेच्या ताब्यात सुरक्षित आहे.

(४) आय.आय.टी.,मुंबई यांच्या अहवालात सदर कामे मानकाप्रमाणे झाले नसल्याचे नमुद केले आहे.

उक्त अहवालाच्या अनुषंगाने भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेने खालीलप्रमाणे कारवाई केली आहे :-

- महानगरपालिकेने सदर रस्त्याच्या कामाशी संबंधित पर्यवेक्षण करणारे ४ कनिष्ठ अभियंता व १ उपअभियंता यांना निलंबित केले आहे.
- महानगरपालिकेच्या आर्थिक नुकसानीबाबत आय.आय.टी. मुंबई यांच्याकडून मानकांनुसार कमी केलेल्या कामाच्या रकमेची परिगणना करण्यात येत आहे. त्यानुंषगाने संबंधित ठेकेदारावर नोटीस बजावून सदर रक्कम वसुल करण्याची कार्यवाही भिवंडी-निजामपुर शहर महानगरपालिकास्तरावर सुरू आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## दादर (मुंबई) येथील शारदाश्रम शाळेचे नामांतर करण्याचा निर्णय रद्द करण्याबाबत

**(४०) ४२८५७ (१९-०६-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.किरण पावसकर :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) दादर (मुंबई) येथील शारदाश्रम शाळेचे नाव एसव्हीएम इंटरनॅशनल स्कूल करुन शाळा आयसीएसई मंडळाशी संलग्न करण्याची कार्यवाही करण्यात आली तसेच शिक्षण मंडळ बदलण्यास शिक्षण विभागाकडून “ना-हरकत प्रमाणपत्र” देण्यात आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, पालकसभेने व मुंबई महानगरपालिकेने शाळा प्रशासनाच्या नाव बदलाच्या व शाळा आयसीएसई मंडळाशी संलग्न करण्याच्या प्रस्तावास मान्यता दिलेली नसताना शिक्षण विभागाने परस्पर ना-हरकत प्रमाणपत्र देण्याची कार्यवाही केली, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्नुसार संबंधित दोषींविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०६-०७-२०१८) :** (१) सदर शाळेस आय.सी.एस.ई. मंडळाशी संलग्नीत होण्याकरीता “ना-हरकत” प्रमाणपत्र देण्यात आले आहे.
(२) हे खरे नाही.
(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबईतील धारावी पुनर्विकास प्रकल्प प्रलंबित असल्याबाबत

**(४१) ४२८७६ (१९-०६-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, श्री.प्रसाद लाड, श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईतील धारावीच्या पुनर्विकासासाठी अनेकवेळा निविदा मागविण्यात आल्या असून विकासकांनी सदर प्रकल्पाबाबत अनास्था दर्शविण्याने उक्त प्रकल्प प्रलंबित असल्याचे माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, धारावी पुनर्विकास प्रकल्पाला गती मिळण्यासाठी शासनस्तरावरुन कोणती कार्यवाही वा उपाययोजना करण्यात आली वा येत आहे, त्याबाबतची सदय:स्थिती काय आहे व सदर प्रकल्प किती कालावधीत पूर्ण करण्यात येणार आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (३०-०६-२०१८) :** (१) धारावी पुनर्विकास प्रकल्पाच्या सेक्टर १ ते ४ च्या संदर्भात खरे आहे. धारावी पुनर्विकास प्रकल्पाच्या सेक्टर ५ मधील पुनर्वसनाची कामे म्हाडाच्या मुंबई मंडळामार्फत करण्यात येत आहे.
(२) व (३) संपूर्ण धारावी पुनर्विकास प्रकल्पाचा एकच विभाग करून पुनर्विकास प्रकल्प विशेष उद्देश कंपनी (Special Purpose Vehicle-SPV) च्या माध्यमातून राबविण्यात यावे, असा सुधारीत प्रस्ताव धारावी पुनर्वसन प्रकल्पाने मांडला असून मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील सचिव समितीने त्यास तत्वत: मंजूरी दिलेली आहे. त्यानुसार पुढील कार्यवाही धारावी पुनर्वसन प्रकल्पाकडून करण्यात येत आहे. धारावी पुनर्वसन प्रकल्पाकडून तपशिलवार प्रस्ताव शासनास प्राप्त झाल्यानंतर त्यानुसार पुढील कार्यवाही करण्यात येईल.

___________

## कल्याण (जि.ठाणे) येथील २७ गावांची वेगळी नगरपालिका घोषित करण्याबाबत

**(४२) ४२८८४ (२१-०६-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.धनंजय मुंडे, श्री.जनार्दन चांदूरकर : तारांकित प्रश्न क्रमांक ३७७७२ ला दिनांक १४ मार्च, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कल्याण (जि.ठाणे) येथील २७ गावांची वेगळी नगरपालिका घोषित केल्या खेरिज गावांमधील नागरिक कल्याण-डोंबिवली महापालिकेला पाणी आणि घरपट्टी भरणार नाही अशा इशारा स्थानिक नागरिकांनी शासनाला दिल्याचे माहे मार्च, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर गावांत मुलभूत सोयीसुविधांचाही अभाव असल्याने शासनाने उक्त प्रकरणाची दखल घेऊन २७ गावांकरीता स्वतंत्र नगरपालिका निर्माण करण्याबाबत निर्णय घेऊन त्यांची अंमलबजावणी करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१२-०७-२०१८)** : (१) आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांच्या दिनांक ३१/०३/२०१८ रोजीच्या २७ गावातील पाहणी दौऱ्या दरम्यान काटई या गावातील स्थानिक नागरिकांनी मालमत्ता कराची देयके कमी करण्याबाबत तसेच सदर २७ गावांची नगरपालिका स्थापन करण्याबाबत आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांना विनंती केली, ही वस्तुस्थिती आहे.

(२)
- २७ गावांकरीता महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून पाणी घेऊन महानगरपालिकेमार्फत पाणीपुरवठा केला जातो तर वीज पुरवठा महाराष्ट्र राज्य वीज कंपनीकडून केला जातो.
- या गावातील रस्ते महापालिकेमार्फत विकसित करण्यात येत आहेत.
- केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानांतर्गत कल्याण-डोंबिवली महानगरपालिका हद्दीमध्ये नव्याने समाविष्ट झालेल्या २७ गावांसाठी रुपये १८०.८१ कोटी किंमतीची पाणीपुरवठा योजना शासनाने मंजूर केली आहे.
- सदर योजनेमध्ये २१ कि.मी. उर्ध्ववाहिनी, १७ कि.मी. लांबीची गुरूत्ववाहिनी, २८ जलकुंभ व २२३ कि.मी. वितरण व्यवस्थेचा प्रामुख्याने समावेश आहे.
- सदर प्रकल्पाची निविदा अंतिम टप्प्यामध्ये आहे.
- उपरोक्त नमूद २७ गावांची नगरपरिषद स्थापन करण्यासाठी दिनांक ०७/०९/२०१५ रोजी प्रारूप अधिसूचना निर्गमित केलेली असून त्यानुषंगाने प्राप्त हरकती व सूचनांवर विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांचेस्तरावर कार्यवाही सुरू आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबईतील वांद्रे-कुर्ला संकुलातील रिलायन्स कंपनीच्या भूखंडावरील बांधकामासंबंधी अतिरिक्त अधिमूल्य वसूल करण्याबाबत

**(४३) ४२८८६ (२१-०६-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, श्री.प्रसाद लाड, श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील वांद्रे-कुर्ला संकुलातील भूखंडावरील बांधकामासंबंधी अतिरिक्त अधिमूल्य वसूली व भोगवटा प्रमाणपत्र देताना एमएमआरडीएने रिलायन्स इंडस्ट्रीला फायदा होईल असे निर्णय घेतले असल्याचे भारतीय नियंत्रक व महालेखा परिक्षक (कॅग) ने आपल्या सन २०१६-१७ च्या अहवालात नमूद केल्याचे माहे एप्रिल, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, एमएमआरडीने बीकेसीच्या जी ब्लॉकमधील १० हजार १८३ चौरस मिटरचा भूखंड क्र.सी. ६६ हा ८० वर्षाच्या भाडेतत्वावर रिलायन्स इंडस्ट्रीला देण्यात आला असून भाडे करारानुसार बांधकाम चार वर्षाच्या कालावधीत पूर्ण न झाल्यामुळे विलंबाचे अतिरिक्त अधिमूल्य २७३ कोटी ५६ लाख रुपये तसेच अतिरिक्त अधिमूल्यावरील १४ टक्के व्याजाची रक्कम रिलायन्स इंडस्ट्रीकडून वसूल करण्यात आली नसल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी जबाबदार अधिकाऱ्यांवर शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे तसेच रिलायन्स कंपनीकडून सदर रक्कम वसूल करण्याबाबत कोणती कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-०७-२०१८) :** (१) भारतीय नियंत्रक व महालेखा परिक्षक (कॅग) यांनी रिलायन्स इडंस्ड्रीला वांद्रे-कुर्ला संकुलाच्या जी-ब्लॉकमधील, सी-६६ या वाटप केलेल्या वाणिज्य भूखंडावरील बांधकाम विहीत वेळेत पूर्ण न केल्यामुळे आकारावयाचे अधिमूल्य न भरल्याबद्दल मुद्या उपस्थित केला आहे.

(२), (३) व (४) सदर अधिमूल्याचा भरणा रिलायन्स कंपनीने न केल्यामुळे मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने दिनांक १२/०९/२०१७ रोजी रिझंप्शनची नोटीस (भूखंड परत घेण्याची) नोटीस दिलेली असून मा.उच्च न्यायालयाच्या

दिनांक १२/१२/२०१७ व १७/०१/२०१८ रोजीच्या अंतरीम आदेशानुसार या मुं.म.प्र.वि. प्राधिकरणाने या कंपनीच्या उर्वरीत परवानग्या (जसे की बांधकाम पूर्णत्वाचा दाखला व इमारतीतील प्रिमायसेस असाइनमेंट करीता ना-हरकत दाखले) उर्वरीत थकबाकी अधिमूल्य वसूलीचा आग्रह न धरता, कार्यवाही करावी असे आदेश दिले आहेत. त्यानुषंगाने सदर प्रकरण न्यायप्रविष्ठ असल्याने मा.न्यायालयाचे पुढील आदेशानुसार कार्यवाही करण्याचे मुं.म.प्र.वि. प्राधिकरणाच्या स्तरावर नियोजित आहे.

---

## ठाणे शहरात क्लस्टर डेव्हल्पमेंट (समूह विकास योजना) राबविण्यात येणार असल्याबाबत

**(४४) ४२८८८ (२१-०६-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर** : सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ठाणे शहरात बहुचर्चित क्लस्टर डेव्हल्पमेंट (समूह विकास योजना) राबविण्यात येणार असल्याचे माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, ठाण्यात सध्या रस्ता रुंदीकरणातील बाधितांना पुरेशा प्रमाणात पुनर्वसनासाठी घरे उपलब्ध नसून समूह विकास योजनेंतर्गत घरे सोडावी लागणाऱ्या नागरिकांना कोणत्या संक्रमण शिबिरात ठेवण्यात येणार आहे व उक्त ठिकाणी पुरेशा सोईसुविधा आहेत काय तसेच नागरिक तेथे स्थलांतरित होण्याकरीता तयार आहेत काय अशा अनेक प्रश्नांबाबत शासनाने खुलासा करुन मुंब्रा, कल्याण-डोंबिवली समूह विकास योजनेबाबत शासनाची भुमिका स्पष्ट करुन योजना कार्यान्वित करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०९-०७-२०१८) :** (१) ठाणे शहराच्या मंजूर विकास नियंत्रण नियमावलीमध्ये नागरी पुनर्निर्माण समुह विकास योजनेची नियमावली दिनांक ५/७/२०१७ च्या अधिसूचनेन्वये समाविष्ट करण्यात आली आहे. सदर नियमावलीमधील तरतुदीनुसार ठाणे महानगरपालिकेने ठाणे महानगरपालिका क्षेत्रात ४४ नागरी पुनर्निर्माण समुह विकास योजनेचे आराखडे तयार करुन दिनांक ५/५/२०१८ रोजी प्रसिध्द केले आहेत.

(२) नागरी पुनर्निर्माण समुह विकास योजनेची अंमलबजावणी सुलभतेने होण्यासाठी सदर नियमावलीमध्ये तात्पुरते संक्रमण शिबिर अनुज्ञेय करण्याची तरतुद करण्यात आलेली आहे. ज्यावेळेस समुह विकास योजनेचे प्रस्ताव प्राप्त होतील, त्यावेळी ट्रान्झीट कॅम्पच्या प्रस्तावास मंजूरी देण्याचे अधिकार आयुक्त, महानगरपालिका यांना देण्यात आले आहेत. तसेच मुंबई महानगर प्रदेशातील बृहन्मुंबई महानगरपालिका, नवी मुंबई महानगरपालिका व पनवेल महानगरपालिका क्षेत्रामधील सिडकोचे क्षेत्र वगळून उर्वरित महानगरपालिका क्षेत्रासाठी एकात्मिक विकास नियंत्रण नियमावली लागू करण्याचा निर्णय घेवून सदरची नियमावली कलम ३७(१कक) मधील तरतूदीनुसार आम जनतेकडून हरकती/सूचना मागविण्याकरीता प्रसिध्द केली आहे. या नियमावलीमध्ये नागरी पुनर्निर्माण समूह विकास योजनेची नियमावली अंतर्भूत करण्याचे प्रस्तावित असून, सदरची नियमावली मंजुर झाल्यानंतर ती कल्याण-डोंबिवली महानगरपालिका क्षेत्रासाठी सुध्दा लागु होईल.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील शिवकालीन गड-किल्ल्यांची दुरवस्था झाल्याबाबत

**(४५) ४२९२२ (२१-०६-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **सांस्कृतिक कार्य मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात अनेक ठिकाणी शिवकालीन गड-किल्ल्यांचे बुरुज, गुप्त मार्ग, दरवाजे, तळी, वाडे, जुन्या इमारती, पडलेल्या आणि जमीनदोस्त अवस्थेत झाल्याने किल्ल्यांची सुरक्षितता धोक्यात आल्याचे माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील शिवकालीन गड-किल्ल्यांची दुरवस्था दुर करुन किल्ले पर्यटन आणि अभ्यास सहलीसाठी खुले करावी अशी मागणी किल्ले बचाव समितीने शासनाकडे केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन शिवकालीन गड-किल्ल्यांची दुरवस्था दुर करण्यासाठी निधी मंजूर करुन या ऐतिहासिक वास्तूचे बांधकाम कुशल कारागीरांकडून करुन घेण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०५-०७-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) हे खरे नाही.
(३) या विभागाने मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांच्या अध्यक्षतेखाली गड संवर्धन समिती गठीत केलेली आहे. सदर समितीच्या शिफारशीनुसार गड किल्ले संवर्धनाची योजना हाती घेण्यात आली आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कोले (ता.वाडा, जि.पालघर) येथील जलस्वराज्य कामात गैरव्यवहार झाल्याबाबत

**(४६) ४३१२७ (२७-०६-२०१८). श्री.आनंद ठाकूर, श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **पाणीपुरवठा व स्वच्छता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कोले (ता.वाडा, जि.पालघर) हे गाव जलस्वराज्य प्रकल्पांतर्गत ग्रामपंचायत बॅच ३ मध्ये निवडण्यात येऊन जलस्वराज्य कृती आराखडा रुपये ५८,१९,८९५/- मंजूर करण्यात आला, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर योजना मंजूर झाल्यानंतर ठेकेदारांनी जलस्वराज्य काम व्यवस्थित न केल्यामुळे ग्रामस्थांनी लेखी तक्रार केली, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने दोषी असलेले अधिकारी व ठेकेदार यांच्यावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.बबनराव लोणीकर (०४-०७-२०१८) :** १) होय, हे खरे आहे.
(२) या योजनेच्या अनुषंगाने कोने, ता.वाडा येथील सामाजिक कार्यकर्ते श्री.जितेंद्र गायकवाड यांचेकडून दिनांक १८ एप्रिल, २०१८ रोजी तक्रार पत्र जिल्हा परिषद कार्यालयास प्राप्त झाले आहे.
(३) प्रस्तुत प्रकरणी ग्रामीण पाणीपुरवठा विभाग, जिल्हा परिषद, पालघर यांच्यामार्फत चौकशी करण्यात येत आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर शहरातील स्मार्ट सिटी प्रकल्पावर नागरिकांनी हरकत घेतल्याबाबत

**(४७) ४३४६९ (१९-०६-२०१८). श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) भरतवाडा, पारडी, पुनापूर व भांडेवाडीचा काही भाग (पूर्व नागपूर) येथील स्मार्ट सिटी योजनेतील एरिया बेस्ड डेव्हलपमेंट अंतर्गत प्रस्तावित विकासकामांमध्ये जवळपास २००० नागरिकांची घरे प्रभावित होणार असून अंदाजे ६५० नागरिकांनी स्मार्ट सिटी प्रकल्पावर हरकत घेतली असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, नासुप्रची डिमांडची रक्कम भरून, आरएल काढून लोकांनी आयुष्याच्या कमाईतून बांधलेली घरे तोडण्यात येणार असल्याने नागरिकांमध्ये प्रचंड प्रमाणात असंतोष निर्माण झाला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०५-०७-२०१८) :** (१) नागपूर स्मार्ट सिटी प्रकल्पांतर्गत प्रस्तावित क्षेत्राधिष्ठित विकास (एरिया बेस्ड डेव्हलपमेंट) या घटकाखाली भरतवाडा, पारडी, पुनापूर व भांडेवाडी येथील १७३० एकर भागासाठी प्रारूप नगर रचना परियोजना (ड्राफ्ट टाऊन प्लांनिंग स्कीम) तयार करण्यात आलेली आहे.

सदर परियोजनेस नियोजन प्राधिकारी म्हणून नागपूर सुधार प्रन्यासच्या विश्वस्त मंडळाने मंजुरी प्रदान केली आहे.

सदर मंजूर परियोजनेवर नागरिकांच्या ७५९ हरकती व सूचना प्राप्त झाल्या असून महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६ नुसार परियोजना पुन्हा मंजुरीसाठी नियोजन प्राधिकारी म्हणून नागपूर सुधार प्रन्यासच्या विश्वस्त मंडळाकडे लवकरच सादर करण्यात येणार आहे हे खरे आहे.

(२), (३) व (४) प्रारूप नगर रचना परियोजनेवर हरकती व सूचना प्राप्त झाल्या असून त्यानुसार परियोजना पुन्हा मंजुरीसाठी नियोजन प्राधिकारी म्हणून नागपूर सुधार प्रन्यासच्या विश्वस्त मंडळाकडे लवकरच सादर करण्यात येणार आहे तरी नागरिकांमध्ये कोणत्याही प्रकारचा असंतोष नाही.

---

## शासनाने झोपडपट्टीवासीयांकडून ५०० चौ. फुटांपर्यंत कोणत्याही स्वरूपाचे शुल्क आकारले जाणार नाही असे घोषित केल्याबाबत

**(४८) ४३४७५ (२१-०६-२०१८). श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्य शासनाने झोपडपट्टीधारकांना मालकीहक्काचे पट्टेवाटप करण्याच्या जाहिर केलेल्या निर्णयानूसार ५०० चौरस फुटांपर्यंत कोणत्याही स्वरूपाचे शुल्क आकारले जाणार नाही असे घोषित करण्यात आले असूनही प्रत्यक्षात झोपडपट्टीधारकास दोन वेगवेगळया डिमांड पाठविण्यात आल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, भूभाटकाच्या नावाने झोपडीधारकांकडून ३० वर्षापर्यंत सुमारे अडीच लाखांहून अधिक पैसे वसूल केले जाणार असून हे मालकीपट्टे नसून

लीजवरील प्रमाणपत्र असल्यामुळे लीजपोटी प्रति चौरस फूट ९६९ रूपये भू-भाटक कराच्या नावाखाली आकारण्यात येत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, झोपडपट्टीवासी सदर जागेवर राहायला आले त्यावेळी या जमिनी दुर्लक्षित होत्या त्यामुळे विकासशुल्क आकारून वा त्यादिवशीच्या जमिनीचा शासकीय दर तसेच दरवर्षी १६ टक्के व्याज (हा सरकारी व न्यायालयाचा नियम) आकारून जमिनीची रजिस्ट्री शासनाने करून दिल्यास झोपडपट्टीवासीयांवर अन्याय होणार असल्याचेही निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, सध्याच्या मालकीपट्ट्याच्या अटीमुळे जमिनीची पूर्ण किंमत वसूल करूनही जमिनीचा मालक स्वत:च्या मर्जीप्रमाणे बांधकाम करू शकत नसल्यामुळे पुनर्वसन होवूनही स्वत:च्या हक्काचे घर जमीन मालकास मिळणार नसल्याचेही निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(५) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले आहे व त्यानुसार संबंधितांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (११-०७-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

नागपूर येथील पॅन्थर नगर झोपडपट्टीमध्ये असलेल्या एकूण ८ सेक्टर पैकी सेक्टर-"ए" मध्ये दिनांक ०१/०३/२०१७ रोजी पट्टयांचे वाटप करण्यात आलेले होते. त्यानंतर सेक्टर-"बी" मधील झोपडपट्टीधारकांना वाटप करावयाची मागणीपत्रे अनावधानाने सेक्टर-"ए" मधील झोपडपट्टीधारकांना वाटप करण्यात आल्याचे निदर्शनास आल्यानंतर, सदरची मागणीपत्रे रद्द करण्यात आलेली आहेत.
(२) नागपूर सुधार प्रन्यास जमीन विनियोग नियम १९८३ च्या नियम ०९ मध्ये पट्टेधारकांकडून भूभाटक वसूल करण्याची तरतूद असल्याने, भूभाटक कर आकारण्यात आला होता.

तथापि, नागपूर सुधार प्रन्यास विश्वस्त मंडळाने दिनांक १३/०६/२०१८ च्या ठरावान्वये ५०० चौ.फू. क्षेत्रापर्यंतच्या झोपडपट्टीवासियांना भूभाटक कराची आकारणी करु नये असा निर्णय घेतला असून, या निर्णयाची अंमलबजावणी नागपूर सुधार प्रन्यासकडून करण्यात येत आहे.

(३), (४), (५) व (६) शासन निर्णय गृहनिर्माण विभाग दिनांक १०/०२/२०००२ नुसार आणि शासन निर्णय नगरविकास विभाग, दिनांक २४/०८/२०१६ नुसार, गलिच्छ वस्ती म्हणून घोषित वसाहतीतील रहिवास प्रयोजनार्थ असलेल्या धारकांना पट्टेवाटप करताना अनुसूचित जाती/ अनुसूचित जमाती / इतर मागासवर्ग व आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटक इ. प्रवर्गांना अधिमूल्याची आकारणी न करता वाटप करण्यात यावे व उर्वरित घटकांच्या बाबतीत ५०० चौ.फू. क्षेत्रापर्यंत अधिमूल्याची आकारणी करण्यात येऊ नये. असा निर्णय झालेला असून, त्यानुसार नागपूर सुधार प्रन्यासकडून अंमलबजावणी करण्यात येत आहे.
तसेच या शासन निर्णयानुसार झोपडपट्टीवासियांकडून पट्टयाची किंमत वसूल केलेली नाही तसेच ज्या पट्टयावर इमारतीचे बांधकाम अस्तित्वात आहे अशाच धारकांना पट्टेवाटप करण्यात आलेले आहे. असे नागपूर सुधार प्रन्यासच्या अहवालात नमूद आहे.

---

## मुंबई, परळ येथील महात्मा गांधी मेमोरीयल रूग्णालयातील परिचारीकांना शासकीय भूखंडावर घर मिळवून देण्याचे आमिष दाखवून फसवणूक केल्याबाबत

**(४९) ४३७०६ (२१-०६-२०१८). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई, परळ येथील महात्मा गांधी मेमोरीयल रूग्णालयातील ३० परिचारीकांना शासकीय भूखंडावर घर मिळवून देण्याचे आमिष दाखवून ८८ लाखांची फसवणूक केल्याची बाब निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, महात्मा गांधी मेमोरीयल रूग्णालयाच्या नर्सेस प्रशिक्षण विभागाच्या प्रिन्सीपॉल अलका सखळ यांच्या मध्यस्थीने पोलीस महिलेच्या पतीने ही फसवणूक केल्याचे निदर्शनास आले असून दिनांक १८ एप्रिल, २०१८ रोजी वा त्यासुमारास काळाचौकी पोलीस स्टेशनमध्ये फसवणूकीचा गुन्हा दाखल करण्यात आला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी चौकशी करण्यात आली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कारवाई करण्यात आली वा येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२९-०६-२०१८) :** (१), (२) व (३) शासकीय भूखंडावर घर देण्याचे आमिष दाखवून फसवणूक केल्याप्रकरणी काळाचौकी पोलीस ठाणे येथे गु.र.क्र. ६०/१८ कलम ४२०, ४०६, ३४ प्रमाणे गुन्हा दाखल करण्यात आला असून दोन आरोपींना अटक करण्यात आली आहे.
सदर गुन्हयाचा तपास सुरु आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राजपूरी कोळीवाडा (ता.मुरुड, जि.रायगड) येथील शासकीय जागेतील चौथाऱ्याच्या जागेत अनधिकृतरित्या झोपडी बांधण्यात आल्याबाबत

**(५०) ४३७७६ (२१-०६-२०१८). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राजपूरी कोळीवाडा (ता.मुरुड, जि.रायगड) येथील राजपूरी मुस्लिम दफनविधी समोरील शासकीय जागेतील चौथाऱ्यावर श्री.हरिदास पांडुरंग बाणकोटकर यांनी अनधिकृत झोपडी बांधली असून सदर झोपडीमुळे स्थानिक मच्छिमार बांधवाना मच्छीची वाहतुक तसेच मासेमारीसाठी लागणाऱ्या साहित्याची वाहतुक करण्यास अडथळा निर्माण होत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, श्री महालक्ष्मी मच्छिमार विविध कार्यकारी सहकारी सोसायटी लि. राजपूरी या संस्थेचे संचालक तसेच बंदर विभागाचे निरिक्षक यांनी दिनांक ३ ऑगस्ट, २०१७ रोजी वा त्यासुमारास संयुक्त बैठक घेऊन सदर अनधिकृत झोपडी निष्कासित करण्याबाबत श्री.हिरदास बाणकोटकर यांना सूचना देण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर अनधिकृत झोपडी सूचना देवूनही हटविण्यात न आल्याने बंदर निरीक्षक, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, राजपूरी समुह यांनी दिनांक १८ ऑगस्ट, २०१७ रोजी झोपडी हटविण्याबाबत नोटीस बजावून देखील अद्यापपर्यंत अनधिकृत झोपडी निष्कासित करण्यात आलेली नाही, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, तहसिलदार, मुरूड (जि.रायगड) यांनी सदर झोपडी निष्कासित करण्याबाबत बंदर निरीक्षक, महाराष्ट्र मेरिटाईम बोर्ड, राजपूरी यांना दिनांक २३ ऑक्टोबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास पत्र देऊनही कोणतीही कारवाई करण्यात आलेली नाही, हे ही खरे आहे काय,
(५) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार शासनाने सदर अनधिकृत झोपडी निष्कासित करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१०-०७-२०१८) :** (१), (२) व (३) होय.
(४) हे खरे नाही.
(५) कार्यकारी दंडाधिकारी मुरुड जंजिरा यांनी दिनांक ०३/११/२०१७ रोजीच्या पत्रान्वये महालक्ष्मी मच्छीमार वि.का.स. सोसायटी लि., राजपूरी यांच्यामार्फत अतिक्रमण दुर करावे व त्यासाठी आवश्यक तो पोलीस बंदोबस्त व सहकार्य करण्यात येईल असे महालक्ष्मी मच्छीमार वि.का.स सोसायटी लि., राजपुरी यांना कळविले आहे. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांनी दिनांक ०२/०५/२०१८ रोजीच्या अर्धशासकीय पत्रान्वये सदरचे अतिक्रमण हटविण्यासाठी कार्यवाही करण्याबाबत जिल्हाधिकारी, रायगड यांना कळविले आहे.
(६) प्रश्न उद्भवत नाही.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**डॉ. अनंत कळसे**
**प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.